**जीवनवेतनासह रोजगाराचा मानवी हक्क आणि व्यवस्था परिवर्तन - १**

**वसंत पळशीकर**

***बेकारीचे समूळ उच्चाटन करण्याचे उद्दिष्ट आपल्या देशात दुसऱ्या पंचवार्षिक योजनेपासून स्वीकारण्यात आले आहे. परंतु तरीही बेकार व अर्धबेकारांची संख्या दिवसागणिक वाढतच आहे. प्रत्येक सक्षम व्यक्तीस रोजगार मिळावा ही समाजाची जबाबदारी आहे आणि तो व्यक्तीचा एक प्राथमिक व मूलभूत अधिकारही आहे. आर्थिक व सामाजिकदृष्ट्या अत्यंत विषम समाजातही सर्वांना रोजगार मिळेल अशी व्यवस्था केली जाऊ शकते. अर्थात प्रत्येकास रोजगार द्यावयाचा तर प्रत्येकास काही ना काही पातळीचे जीवन जगणे शक्य करणारी मिळकत देण्याचीही जबाबदारी उचलावी लागते.***

दहा वर्षामध्ये बेकारीचे समूळ उच्चाटन करण्याचे उद्दिष्ट दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या वेळी स्वीकारण्यात आले होते. बेकारीचे संपूर्ण उच्चाटन तर झालेले नाहीच, पण बेकार व अर्धबेकार यांच्या संख्येत वाढ होत आहे. योजना आयोगाने केलेल्या अंदाजानुसार जीवनात बकारी कायमच्या आजारासारखी पाचवीला पुजलेली आहे अशांची संख्या १९५८ साली ४४ लाखांच्या घरात होती. वर्षातला कोणताही एक सामान्य दिवस घेतला तर देशभरात सुमारे २ कोटींहून अधिक व्यक्ती त्यादिवशी बेकार असतात असा अंदाज आहे. दरवर्षी श्रमिकांमध्ये पन्नास लाखांची भर पडते. त्यापैकी फक्त साडेपाच लाख व्यक्तींना (११%) "संघटित" क्षेत्रात रोजगार मिळतो. मळे, खाणी, कारखानदारी, सार्वजनिक सेवा उद्योग, इतर सार्वजनिक सेवा, आणि व्यापार व वाहतूक या क्षेत्रातील नोंदविलेली व सरकारात आकडेवारी सादर करणारी युनिट्स यांचा समावेश संघटित क्षेत्रात होतो. बाकि च्यांना शेती वा अन्य बारीकसारीक उद्योग यांच्यावर अवलंबून राहून पोटाची खळगी कशीबशी भरावी लागते.

योजना आयोगाने शेतीच्या क्षेत्राच्या विषयी सादर केलेली आकडेवारी ध्यानात घेण्याजोगी आहे. १९२१ साली ७२ टक्के लोक शेतीवर अवलंबून होते. १९६१ साली पण ७३ टक्के लोक उपजीविकेसाठी शेतीवर अवलंबून होते. १९७१ साली यांचे प्रमाण ७३. ८ टक्के, म्हणजे थोडे वाढलेलेच होते. १९६१ ते १९७१ या दशकात शेतीवर अवलंबून असणाऱ्या शेतमजुरांच्या संख्येत जवळपास दोन कोटींची भर पडली. असंघटित श्रमिकांच्यामध्ये शेतमजूरांची टक्केवारी १८ वरून २९ वर गेली. अगदी छोट्या शेतकऱ्यांची जमीन त्यांच्या हातून जाण्याने, प्रगल्भ उत्पादनतंत्रांच्या आक्रमणामुळे, कारागिरी व्यवसाय बुडाल्याने, गरीबीपोटी स्त्रियांना रोजगारासाठी घराबाहेर वाढत्या प्रमाणात पडावे लागल्यामुळे, आणि बिगर शेती व्यवसायांमध्ये रोजगार उपलब्ध न झाल्याने ही भर पडलेली आहे, असा आपला शेरा योजना आयोगाने दिला आहे. *

* पाचव्या योजनेच्या खडर्यातील ही माहिती इकॉनॉमिक अॅण्ड पोलिटिकल वीकलीच्या विशेषांकाच्या (खंड १४, अंक ३०, ३१, व ३२) संपादकीयावरून घेतली आहे.

ही परिस्थिती चिंताजनक आहे. परिस्थिती सुधारण्याऐवजी उत्तरोत्तर अधिकाधिक बिघडत का चालली आहे? आणि त्यावर उपाय काय? बेकारी वाढत जावी याची काय कारणे आहेत?

आजही भारतातील सुमारे पंचाहत्तर टक्के लोक खेड्यापाड्यातून शेतीवर अवलंबून आहेत. तेव्हा शेतीचा आणि रोजगाराचा असलेला संबंध समजावून घेण्याचा प्रथम प्रयत्न करणे ठीक होईल. शेतीमध्ये किती लोकांना काय मिळू शकेल ही गोष्ट जमिनीचे क्षेत्र, शेतीची सघनता, घेतल्या जाणाऱ्या पिकांचा प्रकार यांच्यावर अबलंबून असते ही गोष्ट आपणास दिसते. लागवडीखालील जमीन जर वाढत नसेल आणि अधिक लोकांना शेतीवर काम मिळावयाचे असेल तर? जिराईत शेतीचे रूपांतर बागाईत शेतीमध्ये केले, किंवा एक पीक जेथे घेतले जात होते तिथे दोन पिके, तीन पिके घेतली, किंवा ज्यात पुष्कळ जास्त देखभाल व मशागत जरूरीची आहे अशी पिके घेतली, किंवा आजच्यापेक्षा अधिक श्रम लावून संघनं मशागत करून उत्पादन वाढविण्याचा प्रयत्न केला तर जास्त लोकांना शेतीत रोजगार मिळेल. या अर्थाने शेतीची सघनता वाढली आहे त्या प्रमाणात शेतीमध्ये जास्त लोकांना रोजगार गेल्या तीस पस्तीस वर्षांमध्ये उपलब्ध झाला आहे. पण या मार्गाने जेवढ्या प्रमाणात रोजगार वाढ शकेल तेवढा तो न वाढण्याची कारणे पाहण्यासारखी आहेत.

(१) देशात सर्वत्रच असे मोठे जमीनदार आहेत की जे आपली शेती अधिक सघनपणे करू इच्छित नाहीत. याची वेगवेगळी कारणे आहेत. त्यांना पोटापाण्यासाठी लागणारे उत्पन्न हस्तगत करण्यासाठी शेतींची सघनता वाढविण्याची गरज नाही.

(२) शेती अधिक सघन करण्यासाठी त्यात विविध प्रकारची भांडवली गुंतवणूक (बांधबंदिस्ती, विहिरी, औजारे व यंत्रे, खते, अधिक श्रम, इ. स्वरूपात) करण्याची गरज असते. ऐपत असूनही अशी गुंतवणूक करण्याची ज्यांची दृष्टी नाही असेही शेतकरी फार मोठ्या संख्येने आहेत.

(३) अल्प जमीनधारकांचा मोठा वर्ग आपल्या देशात आहे की ज्याची अशी भांडवल गुंतवणूक करण्याची कुवत नाही. त्यासाठी लागणारी महत्त्वाकांक्षा, उभारी व मिस्तही नाही. आणि त्याला हवा तो पाठिंबा व सहाय्य समाजाकडूनही नाही.

(४) शेतीच्या आधुनिकीकरणाबरोबर नफा वाढविण्याची प्रेरणाही शेतकऱ्यांच्या ठिकाणी निर्माण झाली आहे. त्यातून शेतीमध्ये भांडवल गुंतवणूक करताना श्रमाची बचत ज्यामधून होते अशी यंत्रे वापरात आणण्यावरचा भर वाढला आहे. त्यामुळे शेतीत कमी लोकांना काम मिळण्याची परिस्थिती अशांच्या शेतावर निर्माण होत आहे. ( काही प्रेरणाचे आधुनिकीकरणाच्या हव्यासापोटीही नफा वाढेल की नाही याचा विचार न करताही यंत्रांचा वापर केला जातो.)

या कारणांच्या जोडीला आणखीही काही कारणे लक्षात घेण्यासारखी आहेत.

( ५ ) शेतमालाच्या ( व इतर मालाच्या ) वाहतुकीच्या क्षेत्रात खनिज तेलावर चालणाऱ्या यांत्रिक साधनांचा वापर सर्रास वाढला आहे. या क्षेत्राच्या विस्ताराबरोबर त्यात रोज-. गारही वाढला असला तरी ग्रामीण भागातील एक मोठा पूरक रोजगार मोठ्या प्रमाणात कमी झाला आहे.

(६) खेड्यापाड्यातून वीसबावीस टक्के लोक असे आहेत ज्यांच्यापाशी जमीन हे उत्पादनाचे साधन नाही. भरीला असेही लोक आहेत ज्यांच्या मालकीची जमिन अगदी थोडी आहे. आपल्याजवळील भांडवल गुंतवून दुसरा कोणता व्यवसाय करण्याइतके त्यांच्यापाशी भांडवल नाही. आणि भांडवल उपलब्ध करून दिले तरी आणखीही काही गोष्टींची व्यवस्था ( व्यावसायिक प्रशिक्षण, व्यवस्थापनाचे प्रशिक्षण, सुरक्षित बाजारापेठ, इ. ) झाल्याशिवाय ते अशा व्यवसायांमध्ये पडू शकत नाहीत कारण जे पर्यायी व्यवसाय ते करू शकतील त्यांच्यासाठी बाजारपेठ ही लांब, शहरात आहे आणि हे व्यवसाय त्यांना अपरिचित आहेत.

या वर्गाजवळ स्वतःच स्वतःसाठी रोजगार निर्माण करण्याची क्षमता अत्यल्प आहे. समाजातील इतर घटकांनी त्यांच्या श्रमशक्तीला काम पुरवले, म्हणजेच कामावर ठेवले, तरच त्यांना रोजगार मिळू शकतो. त्यामुळे उत्पादनाची साधने ज्यांच्या मालकीची आहेत त्यांना आपली श्रमशक्ती विकण्याचा प्रयत्न करून, वा त्यांच्याकडे आपली श्रमशक्ती गहाण टाकून चरितार्थ चालविण्याचा प्रयत्न त्यांना करावा लागतो.

ग्रामीण, शेतकी भागातल्या या परिस्थितीतूनही काही बोध आपल्याला होऊ शकतो.

(१) समाजाचे सभासद असणाऱ्या सर्वांना रोजगार मिळेल अशी उत्पादनव्यवस्थेची रचना केली पाहिजे हे आजच्या अर्थव्यवस्थेचे वा समाजव्यवस्थेचे मूल्य वा उद्दिष्ट नाही. यो गोष्टीला अग्रक्रम नाही वा तिचा आग्रह नाही.

(२) समाजातल्या काही व्यक्तींना रोजगार नसल्यास त्यांच्या पालनपोषणाची, त्यांना रोजगार पुरविण्याची जबाबदारी साधनवानांची आहे, समाजाची आहे अशी मान्यता नाही, असे बंधन समाजधुरीणावर नाही.

(३) ग्रामीण भागात असलेल्या लोकसंख्येस रोजगार पुरविण्यासाठी आवश्यक त्या प्रमाणात उत्पादनाची साधनाहीत ने असलेल्या साधनांमध्ये पूरक स्वरूपांची भांडवल गुंतवणूक नाही.

(४) उत्पादनाचे साधन, भांडवल, बाजारपेठ यांच्या अभावी रोजगार निर्मिती शक्य नाही. स्वावलंबी (self-employed ) रोजगार निर्मितीसाठीही यांची आवश्यकता तेवढीच आहे.

(५) भांडवल गुंतवणूक जर श्रमबचत करणाऱ्या उत्पादनतंत्रात यंत्रात केली तर रोजगार निर्मिती होण्याऐवजी रोजगारात घट होऊ शकते.

(६) उत्पादनसाधनांचे केंद्रीकरण हे अधिक रोजगार निर्माण करण्याच्या दृष्टीने अनुपकारक आहे. ज्यांच्या होती उत्पादनसाधनांची

मालकी केंद्रित झालेली आहे ते (१) त्यांच्या सघन वापराविषयी उदासिन असण्याची शव्यता खूप असते, (२) त्यांची दृष्टी केवळ स्वार्थी व नफ्याची असेल तर श्रमबचत करणारी उत्पादनतंत्र आणि पंत्रे वापरण्याकडे त्यांची प्रवृत्ती असते, किंवा (३) श्रमिकाची पिळवणूक करण्याकडे कल असतो.

(७) उत्पादन व उपभोग या एकंदर प्रक्रियेतून सर्वांना रोजगार निर्माण करण्याच्या दृष्टीच्या अभावी पूर्ण रोजगाराची परिस्थिती अस्तित्वात येणे दुरापास्त आहे.

आपण कारखानदारी उद्योगांच्या क्षेत्राचा विचार करू. भारतात शेतीवर लोकांचा अतिरिक्त भार आहे व तो कमी करण्याचा औद्योगीकरण ( व शहरीकरण) हा एकच उपाय आहे अशी आपल्यापैकी बहुतेकांची धारणा आहे. शेतजमिनीचे क्षेत्र एका मर्यादेपलीकडे वाढू शकत नाही. सर्व जमीन पाण्याखाली भिजवता येत नाही, किंवा सर्व जमिनमध्ये वर्षाला दोन तीन पिके घेता येत नाहीत. पण उद्योगांवर अशी कोणतीच मर्यादा नाही असे वाटते. पुरेशा प्रमाणात नवनवीन उद्योग निघत राहिले तर बेकारी सगळी दूर करता यायला हवी. दहा वर्षामध्ये बेकारी दूर करण्याचे उद्दिष्ट मग पुरे का करता आले नाही?

कोणताही उद्योग सुरू करावयाचा तर त्यासाठी भांडवल गुंतवावयास लागते. किती भांडवल गुंतविल्यास किती लोकांना काम मिले ते आपण उत्पादनासाठी कोणते तंत्र वापरतो त्यावर अवलंबून राहाल. हातांनी सूंत काढावयाचे व ते हातमागावरच विणायचे असे ठरविल्यास जेवढ्या लोकांना काम मिळेल त्यापेक्षा आधुनिक भांडवल सघन व श्रमबचत करणाऱ्या यंत्राचा त्यासाठी वापर केला तर पुष्कळ कमी माणसे लागतात ही गोष्ट आपल्या माहितीची आहे. नवे उद्योग सुरू करण्यासाठी कच्चा मालही लागतो आणि पक्क्या मालाला गिऱ्हाईकही असावे लागते.

म्हणजे उद्योगधंदाही अमर्याद संख्येने केवळ कल्पनेतच काढता येतात. भारताची गोष्ट आपण पाहिली तरी बेकारी दूर करण्याच्या दृष्टीने पुरेशा प्रयत्नात उद्योगधंदे सुरू करण्याच्या आड

(१) भांडवलाची कमतरता

(२) बाजारपेठेचा अभाव (म्हणजेच गिऱ्हाईकांजवळ क्रमशक्तीचा अभाव)

(३) भांडवलसघन व श्रमबचत करणाऱ्या उत्पादनतंत्राचा वापर

या तिन्ही गोष्टी आलेल्या आहेत.

जे काही भांडवल उपलब्ध होते त्याचा वापर करताना जर अधिक रोजगार निर्माण करण्याची दृष्टी ठेवली असली तर आपण श्रमसघन उत्पादनतंत्राची निवड करू शकतो, आणि मग त्याच भांडवलाच्य वापराने एरवी उपलब्ध झाला असावा त्यापेक्षा जास्त लोकांना रोजगार मिळतो. उत्पादनतंत्र निवडताना अधिकात अधिक रोजगार निर्माण करण्याची दृष्टी स्वातंत्र्योत्तर काळात ठेवली गेली असे दिसत नाही त्यामुळेही बेरोजगारी दूर करण्यात मर्यादा निर्माण झाल्या.

इथेच ही गोष्ट थांबत नाही. काही उद्योग हे एकदम नवे नसतात. ज्या वस्तूंचे उत्पादन आधुनिक कारखानदारीने केले जाते त्या वस्तू पूर्वी श्रमसघन उत्पादनतंत्राकरवी उत्पादित केल्या जात होत्या असे जेथे असते तेथे आधुनिक श्रमबचत तंत्रांचा वापर केल्याने पूर्वी रोजगारावर असलेल्या अनेक व्यक्ती बेकार होतात. अशा कारणाने बेकारांची निर्मिती आपल्या दशात गेल्या दीडशे वर्षामध्ये होत आली आहे व त्याता अलीकडेही खंड पडलेला नाही.

इथेही आपणास शेतीच्या क्षेत्रातील रोजगारासारख्याच गोष्टी आढळतात. भांडवल वा उत्पादनसाधने नसलेली माणसे स्वतः रोजगार निर्माण करू शकत नाहीत. त्यांना दुसऱ्यावर अवलंबून राहावे लागते. कारागिरी व्यवसायांमध्ये परंपरेने रोजगार प्राप्त करून घेणाऱ्या अनेकांना, त्यांच्या व्यवसायांवर आधुनिक तंत्राधारित कारखानदारीने आक्रमण केल्याने, रोजगार गमवावा लागला आहे.

रोजगारापेक्षा नफा हे उद्दिष्ट याही क्षेत्रात आहे. आणि त्याचे परिणामही तसेच येथेही होतात. उत्पादनाच्या साधनांचे केंद्रीकरण रोजगार वाढविण्याच्या दृष्टीने अनुपकारक ठरते.

उद्योगधंदे वाढविण्यात लोकांच्या क्रयशक्तीचाही मुद्दा महत्वाचा असतो. शेतीतून उत्पादन होणारे अन्नधान्य उत्पादन करणारा खाऊ शकतो. उद्योगधंद्यातून होणारे उत्पादन बहुतेकवेळी असे सरळसरळ खाता येत नाही. म्हणून वस्तू विकत घेणारे आहेत की नाहीत ही गोष्ट महत्वाची ठरते. केवळ भांडवल जवळ असून वा उत्पादनाची साधने असून भागत नाही. क्रयशक्तीच्या अभावी शेतीतले उत्पादनही काही वेळा आपल्या देशात 'फाजील' ठरते आणि शेतकऱ्याला निरुत्साही करते ही गोष्ट आपल्या माहितीची आहे.

शेती व उद्योग यांच्या बाबतीत जी गोष्ट खरी आहे ती सेवा उद्यो गोच्या व नोकऱ्या चाकऱ्यांच्या बाबतीतही खरी आहे.

सर्वांना रोजगार मिळावयाचा असेल तर कोणत्या गोष्टींची मग आवश्यकता आहे?

(१) प्रत्येक सक्षम व्यक्तीस रोजगार मिळावा ही समाजाची जबाबदारी आहे आणि तो व्यक्तीचा एक प्राथमिक व मूल भूत अधिकार आहे, हे तत्त्व समाजातून स्वीकारलेले असले पाहिजे.

(२) धोरणांच्या पातळीवर रोजगार निर्मितीस अग्रक्रम दिला पाहिजे.

(३) रोजगार निर्मितीच्या साठी आवश्यक अशी श्रमसधन उत्पादनतंत्रे निवडण्याचे बंधन स्वीकारले पाहिजे.

(४) 'पुरेसे ' भांडवल उपलब्ध असायला हवे. पण इथे एक महत्तत्वाचा मुद्दा ध्यानात घेतला पाहिजे. निवडलेले उत्पादनतंत्र आणि लागणारे भांडवल यांचा घनिष्ठ संबंध असतो. भांडवल जेवढे उपलब्ध असेल ते "पुरेसे ठरेल अशी अनुरूप उत्पादनतंत्रे निवडण्याचे बंधनही बऱ्याच प्रमाणात स्वीकारावे लागेल.

(५) खाजगी नफा वा 'सामाजिक वाढावा' ( सोशल सरप्लस ) यांच्यात वाढ करण्याच्या सूत्रावर अर्थव्यवस्थेची उभारणी नसली पाहिजे. कारण या दोन गोष्टी आणि रोजगार निर्मीती यांच्यात विसंवाद व विग्रह निर्माण होतो.

(६) उत्पादनसाधनांच्या मालकीचे खाजगी हातांमध्ये वा शासकीय यंत्रणेच्या हाती केंद्रीकरण होता कामा नये. असे केंद्रीकरण रोजगाराचा हक्क बनवण्याच्या आड येते. उत्पादनसाधनांची मालकी ज्याची असते त्या खाजगी मालकाची व राज्यशासनाची आर्थिक उद्दिष्टे जर वेगळी असली तर उत्पादनसाधनविहिन माणसांची कोंडी होते. (७) सर्वांना रोजगार मिळावयाचा असेल तर उत्पादित वस्तू व सेवा यांच्यासाठी पुरेशा प्रमाणात गिऱ्हाईक हवे. ही स्थिती निर्माण होण्यासाठी आर्थिक समता प्रस्थापित होण्याची गरज नसते. आर्थिक व सामाजिक दृष्ट्या अत्यंत विषम समाजातही सर्वांना रोजगार मिळेल अशी व्यवस्था केली जाऊ शकते. अर्थात प्रत्येकास रोजगार द्यावयाचा तर काही ना काही पातळीचे जीवन जगणे शक्य करणारी मिळकत देण्याचीही जबाबदारी उचलावी लागते.

(क्रमश:)

**जीवन वेतनासह रोजगाराचा मानवी हक्क आणि व्यवस्था परिवर्तन - २**

***या लेखाचा पहिला भाग आम्ही मागील अंकात प्रसिद्ध केला होता. त्यात लेखकान सर्वाना रोजगार मिळावयाचा असेल तर कोणत्या गोष्टीची जरूरी आहे याचा प्रामुख्याने विचार केला होता. या दुसऱ्या भागात लेखकाने स्वायत्त समाज संस्कृतीचा व व्यवस्थेचा भाग म्हणून जीवनवेतनासह रोजगार सर्वाना मिळणे आवश्यक आहे या मुद्दयावर भर दिला असून, त्यासाठी कोणती पावले उचलावी लागतील याचे विवेचन केले आहे.***

आतापर्यंत आपण केवळ रोजगार देण्याची गोष्ट केली. वेतन किती मिळावे वा मिळकत किती व्हावी, आर्थिक समानता असावी की नाही हे मुद्दे आपण उपस्थित केलेले नाहीत. ते या ठिकाणी उपस्थित करायला हवेत.

आजही आपण सभोवताली पाहिले तर काय दिसते? बेकारीचे मान प्रचंड आहे असे म्हणत असतानाही निव्वळ बेकार बसून राहणारी माणसे आपणास क्वचितच दिसतात. पोटासाठी काहीतरी उद्योग माणसे शोधत असतात आणि किडुकमिडुक का होईना मिळवत असतात. अर्धपोटी का होईना जगत असतात. सुशिक्षितांमधेच बहुधा निव्वळ बेकार आपणास आढळून येतात कारण नोकरी मिळेपर्यंत दुसरे कोणतेही काम न करण्याकडे कल एक या थरातच आढळतो. दिवसाकाठी तीन- चार रुपये, नव्हे दोनेक रुपये देणारे

काम रोजगार हमी योजने खाली मिळाल्यावर माणसांची जी रांग लागते, ती पाहिल्यावर या देशात बैठे मनुष्यबळ किती आहे. त्याची कल्पना येते.

म्हणून माणूस काही ना काही उद्योग मागे लावून घेऊन काही तरी मिळवताना दिसला की त्याला रोजगार मिळालेला आहे असे समजता कामा नये. रोजगार मिळाला आहे की नाही याची कसोटी त्याला जीवन वेतन मिळाले आहे की नाही त्यावरून केली पाहिजे

जीवनवेतन म्हणजे अमूक एक रक्कम अशी मांडणी करता येत नाही, काही संदिग्धता त्यात राहून जाते, हे खरे आहे. पण याने फारसे बिघडत नाही. अगदी आवश्यक किमान पातळीवर जगण्यासाठी माणसाला त्या त्या वेळी किती लागते ते ती माणसेच व्यवहारात ठरवीत असतात. उदाहरणार्थ रोजगार हमीच्या कामांवर कष्ट करणाऱ्या लोकांना आठवड्यास पंधरा वीस रुपयांपर्यंत (गहू धरून) पगार पडला नाही तर आपणास फार कमी रोजी पडली असे वाटते. इतके थोडें मिळणार असेल तर कामावर जाण्यात काय अर्थ असे त्यांना वाटते. अलीकडे एका शिबिरात रोजचे किती रुपये मिळाले तर कुटुंबांचे भागेल असा मुद्दा उपस्थित केला असता जमलेल्या ग्रामीण युवकांनी पाच ते सात रुपयांपर्यंत आकडे सांगितले. अडीच-तीन रुपये रोज पडून जर वर्षभर नियमित काम मिळाले तर आपणास जगण्याइतके उत्पन्न मिळाले असे बहुसंख्य ग्रामीण स्त्री-पुरुषांना वाटेल असे म्हणावयास हरकत नाही. वस्तूंच्या भाषेत मांडावयाचे तर दोन वेळचे साध्यांतले साधे जेवण सुटले आणि वर विडीकाडीसाठी, कापडासाठी जरा पैसे हाती राहिले तर त्यांचे समाधान होईल.

जीवन वेतनाची या पातळीवरील कल्पना ही उपरी आहे. कारण माणसाच्या इतरही काही गरजा प्राथमिक असतात. त्यांची जाणीव खेडुत मंडळीमध्ये स्पष्ट स्वरूपात आज नाही. पण किमानपक्षी त्यांचे समाधान होण्याइतके त्यांना मिळावयाचे असेल तर किती मिळावयास हवे हे स्पष्ट आहे. आणि एवढे जीवन वेतन मिळत असेल तरच ती व्यक्ती रोजगार संपन्न आहे असे आपण म्हणावे.

दुसरा मुद्दा समानतेचा आहे. सरंजामशाहीत व जातिव्यवस्थेत सर्वांना काही ना काही काम लावून दिलेले असे आणि सर्वांनी उदरभरणाची काही जबाबदारीही पत्करलेली असे. ही व्यवस्था ग्रामीण भागात अधिक परिपूर्ण स्वरूपात अस्तित्वात होती. समाजोपयोगी उत्पादनात प्रत्येकाचा काही एक हिस्सा आहे ही गोष्ट स्वीकारलेली होती. हा हिस्सा किती ते ठरविण्याचा अधिकार समाज धुरीणांच्या वरिष्ठ वर्गीयांचा हाती होता. हिस्सा असमान असे. आणि आपआपल्या हिश्श्यावरचा अधिकार जरी सर्वांना बजावता येत असला तरी समाजातील काही थरांतील व्यक्तींना तो बजावण्याच्या ओघात लाचारी, गुलामी, अर्धगुलामी पत्करावी लागत असे. स्थूलमानाचे समाजात प्रत्येकाचा व्यवसाय जन्माने ठरत असे व तो व्यवसाय करून उत्पादनातील हिश्शावर आपला हक्क प्रस्थापित करण्याचा अधिकार व्यक्तीस (वा कुटुंबास ) असला तरी व्यवसाय स्वातंत्र्य सामान्यतः नव्हते. आणखीही एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. ज्या विविध वस्तू सेवांचे उत्पादन समाजाचे होत असे त्या सर्वांमध्ये सर्वांना हिस्सा मिळत नसे. अस्पृश्यांपैकी काही जातींना उष्टे खरकटे मिळत असे, मेलेल्या जनावरांचे मांस त्यांच्या वाट्याला येत असे. तर काही गोष्टी वा सेवा त्यांच्या वाट्याला येतच नसत.

समाजाचा सभासद असलेल्या प्रत्यक व्यक्तिंच्या पालनपोषणाची जबाबदारी, त्याला काम पुरविण्याची जबाबदारी पार पाडता येईल अशी समाजव्यवस्था असली पाहिजे. होणाऱ्या उत्पादनात प्रत्येकाचा हिस्सा असला पाहिजे. काम मागण्याचा अधिकार बजावता आला पाहिजे. आपल्या पारंपारिक जातिधिष्टं ग्रामीण समाजात या तत्वांना मान्यता होती व व्यवहारात त्यांची अंमलबजावणीही होत होती असे दिसते. समाजरचना विषम व अन्याय्य होती. तीमध्ये अंगभूत दडपणूक होती, व एका अंगाने स्वातंत्र्याचा संकोच होता. प्रत्येक सक्षम व्यक्तीस जीवनवेतनासह रोजगार देणारी भावी काळातील समाजव्यवस्था विषम व अन्याय्य नसली पाहिजे. तीत दडपणूक व स्वातंत्याचा संकोच असता कामा नये हे म्हणून स्वतंत्रपणे व ठामपणे म्हटले पाहिजे.

विषमता, अन्याय, दडपणक व स्वातंत्र्य संकोच ही वैगुण्ये खाजगी मालमत्ताधिष्ठित भांडवलशाहीचीच तेवढी अंगभूत वैविष्ट्ये आहेत अशी एक प्रचलित समजूत आहे. विशेषतः 'डाव्या' विचारसरणीच्या मंडळींमध्ये ही समजूत फार पक्की आहे. सोवियत रशियाचे उदाहरण ध्यानात घेतले तर निसर्गातील संपत्ती उत्पादन साधने, व भांडवल या सर्वांवर राज्यस्वामित्व प्रस्थापित करून खाजगी मालमत्तेस मूठमाती देणाऱ्या समाजात ही सर्व वैगुण्ये तेवढ्याच प्रकर्षाने आढळ शकतात हे दिसून आले आहे. अशा समाजात ही वैगुण्ये अधिक सर्वकष स्वरुपात अस्तित्वात येण्याची शक्यता जास्त असते.

ही वैगुण्ये दूर करून जीवन वेतनासह रोजगार सर्वांना मिळावयाचा असेल तर एक मूलभूत परिवर्तन होण्याची म्हणून गरज आहे. निसर्गातील संपत्ती, उत्पादनाची साधने, आणि भांडवल याच्यांवर उपजीविकेसाठी प्रत्येकाचा जन्मसिद्ध हक्क पोचतो हे स्वीकारले गेले पाहिजे. हा हक्क प्रस्थापित करण्यात खाजगी मालमत्तेच्या तत्त्वाचा जसा अडसर येता कामा नये तसा राज्यस्वामित्त्वाचाही अडसर येता कामा नये. व्यक्तींना हा हक्क बजावणे अशक्य व्हावे अशा स्वरूपात कोणालाही अतिरिक्त प्रमाणात निसर्गातील संपत्ती, भांडवल आणि उत्पादनसाधना वर स्वामित्व सांगता येणार नाही. याचा एक अर्थ असा की, शासना लाही. असे स्वामित्व सांगता येणार नाही. हो जो जन्मसिद्ध हक्क आपण मान्य करतो तो स्वकष्टाने उपजीविका हस्तगत करण्याचा हक्क आहे. कष्ट न करता उपभोग घेण्याचा हक्क आपण कोणाचाच मान्य करीत नाही. साहजिकच दुसऱ्याला कामाला लावून त्याच्या श्रमातून माझा उपभोग संपादन करण्यासाठी मी जे भांडवल गुंतवतो, जी उत्पादनसाधन बाळगतो वा निसर्गसंपत्ती ताब्यात घेतो तीवर माझा हक्क पोचत नाही हे सर्व शासनालाही लागू आहे. तात्पर्य असे की निसर्गसंपत्ती, समाजात कोणत्याही काळात संचित झालेली उत्पादनाची साधने आणि भांडवल यावर ना व्यक्तीची खाजगी मालकी असते ना राज्यसत्तेची 'सामाजिक' मालकी असते. माणसांचा या सर्व गोष्टींवर अतिशय सीमित अधिकार पोचतो. आजच्याच नव्हे तर उद्याच्या पिढ्यान्पिढ्यांचाही या सर्व गोष्टींवर अधिकार पोचतो हेही लक्षात ठेवले पाहिजे. या तीन गोष्टींचा उपयोग करून एक समाधानी व कृतार्थ जीवन जगण्याचा तेवढा सीमित अधिकार माणसांना आहे. हा अधिकार बजावत असताना पुढे येणाऱ्या पिढ्यासाठी निसर्गसंपत्ती, उत्पादनसाधने व भांडवल यांचे संचित धन अक्षय्य राखण्याचे, किंबहुना त्यात जमली तर भर टाकण्याचे कर्तव्य पार पाडण्याचे बंधन त्यांच्यावर आहे. हे कर्तव्य पार पाडणाऱ्यांनाच तो अधिकार आहे. अशा रीतीनें, निसर्गसंपत्ती, उत्पादनसाधने व भांडवल यांचे आपण विश्वस्त आहोत, मालक कोणीच नसतो, हेच आपले खरे नाते आहे.

जीवनवेतनासह रोजगाराचा हक्क प्रस्थापित करावयाचा असेल तर त्याचा एक अंगभूत भाग निसर्ग संपत्ती, उत्पादन साधने आणि भांडवल यांच्याशी विश्वस्त म्हणून आपले नातेही आपण प्रस्थापित करण्याचे कर्तव्य पार पाडावे लागेल.

इंग्रजांच्या राजवटीच्या काळात इथल्या समाजव्यवस्थेची आधारभूत तत्त्वे त्यांनी बदलली. खाजगी मालमत्ता, 'करार स्वातंत्र्य' समानत्वाने स्पर्धा या व्यक्तिवादी तत्त्वांवर आधुनिक, प्रगत समाज निर्माण करण्याचे कार्य त्यांनी आरंभले. स्वार्थ आणि परस्वार्थ दोहोंचाही भाग यात होता. 'पारंपारिक समाजाचे आधुनिकीकरण' असे या प्रकियेचे पाश्चात्यांनी वर्णन केल्यामुळे, आणि आधुनिक बनण्याचे ध्येय आपल्या राज्यकत्यांनी आणि समाजधुरीणांनी समोर ठेवलेले असल्याने याच तत्त्वांवर आपली समाजव्यवस्था प्रगत करण्याचा आंपला नेटाने प्रयत्न चाललला आहे. भांडवलशाही अर्थ व्यवस्थेचे दुष्परिणाम दूर करण्याच्या दृष्टीने राज्यस्वामित्व, सहकार या संकल्पनांचा आश्रय राज्यकत्यांनी एक संमिश्र व्यवस्था निर्माण करण्यासाठी विचारपूर्वक घेतला. बेकारी निवारण, रोजगार निर्मिती, आर्थिक व सामाजिक न्याय ही उद्दिष्टे गाठण्यात ही संमिश्र व्यवस्था यशस्वी झालेली नाही.

आजवरच्या राज्यकर्त्यांनी जाणूनबुजून, दडपणूक व शोषण करण्याचा एक मार्ग म्हणून लोकांना रोजगार न मिळण्याची व्यवस्था केली आहे असे म्हणण्याचा मोह टाळला पाहिजे. भारतात गेल्या तीस बत्तीस वर्षांत मुख्यत्वेकरून काँग्रेसच्या हाती सत्ता राहिली. काँग्रेस ही येथील उच्चवर्णीय व उच्चवर्गीय यांचे हितसंबंध सांभाळणारी, जोपासणारी राहिली आणि त्याचा परिणाम बेकारी व दारि अधिक तीव्र होण्यास झालेला आहे अशी मांडणी केली जाते. आजचे सत्ताधारी हे भांडवलधारांचे बगलबच्चे आहेत असे म्हणून टाकणे सोप असेल, आणि तसे म्हणणे क्रांतिकारक भासत असेल तरी वास्तव अधिक गुंतागुंतीचे आहे. स्वातंत्र्योत्तर काळात प्रदीर्घ काळपर्यंत पं. नेहरू या देशाचे भाग्यविधाता होते आणि त्यांनी आग्रहपूर्वक नियोजनबद्ध आर्थिक विकासाचा मार्ग चोखाळला. समताधिष्ठित, सामाजिक, न्यायधिष्ठित समाज निर्माण करण्याचे उद्दिष्ट त्यांनी डोळ्यासमोर ठेवले. त्यांनी स्थापन केलेला नियोजन आयोग आणि त्याचे कामकाज, नियोजन आयोगाने शिफारस केलेली धोरणे, अर्थ व उद्योग व्यवस्थेला दिलेले वळण या सगळयास उद्देशून ‘भांडवलदारांचे बगलबच्चे' हा शब्दप्रयोग वापरणे घोर अन्यायाचे होईल. भांडवलसघन पायाभूत उद्योगांना प्राधान्य देणारी दुसरी पंचवार्षिक योजना प्रा. महालनोबिस यांच्या प्रभावाखाली तयार झाली ही गोष्टही माहितीची आहे. तात्पर्य असे की, सर्वांना रोजगार व किमान जीवनवेतन मिळावे ही सत्ताधारी राज्यकर्त्यांची उद्दीष्टे असूनही, त्यासाठी आर्थिक उपाययोजना करण्याचे प्रामाणिक प्रयत्न करूनही परिणाम काही वेगळाच येत राहिला.

प्रत्येक सक्षम व्यक्तीस किमान जीवन वेतनासह रोजगार उपलब्ध करून द्यावयाचा असेल तर. आर्थिक औद्योगिक विकासाची कोणती नीती अवलंबावयास हवी याची उमज राज्यकर्त्यांच्या ठिकाणी नव्हती हे खरे कारण आहे. पं. नेहरू पाश्चात्य भांडवलशाही देशांच्या आर्थिक विकासाविषयक नीतीचे अनुकरण करण्याच्या पक्षातले नव्हते. उलट सोविएत रशियाने पंचवार्षिक योजनांच्या द्वारा आपला जो झपाटयाने आर्थिक विकास घडवून आणला त्याचेच त्यांना अधिक आकर्षण होते. रशिया व पुढे चीन, या देशांपासून बोध घेऊन आपली विकासविषयक धोरणे आखण्यावर त्यांचा अधिक भर राहिला. मुद्याची गोष्ट अशी आहे की, देशातली बेकारी दूर व्हावी ही प्रामाणिक इच्छा असली तरी बेकारीनिर्मूलनाचे वा प्रत्येकास जीवनवेतन देण्याचे बंधन ज्यात स्वीकारलेले नाही अशा स्वरूपाच्या आर्थिक विकासाच्या नमून्याचीच कास धरली गेली. याला कारण पाश्चात्य (भांडवलशाही तसेच साम्यवादी) देशांचे अनुकरण करण्याची आपली गुलामी मनोवृत्ती.

भारताचे दारिद्र हटवायचे असेल, येथील लोकांना रोजगार मिळावयाचा असेल तर झपाट्याने औद्योगिकरण करून उत्पादनवाढ केली पाहिजे हाच बोध आपल्या राज्यकर्त्यांनी पाश्चात्य देशांच्या उदाहरणापासून घेतला. भांडवलशाही देशांपासूनच नाही तर सोविएत रशियाच्या उदाहरणापासूनही. शेतीवर फाजील प्रमाणात लोकसंख्येचा भार आहे, शहरी, आधुनिक, भांडवलसघन तंत्रांचा वापर करून चालणाऱ्या उद्योगांचा वेगवान विस्तार हाच त्यावरील एकमात्र उपाय, अशी धारणा होती. नियोजनाच्या क्षेत्रात आपल्या देशात दोन प्रवाह होते. यंत्रसामग्रीच्या वा अन्य पायाभूत वस्तूंच्या उत्पादनाच्या बाबतीत स्वयंपूर्ण होण्याचा आग्रह प्रारंभीच्या काळात न धरता, त्यासाठी परदेशांवर अवलंबून राहून, उपभोगाच्या वस्तू उत्पादन करणाऱ्या, शेती उत्पादन वाढविणाऱ्या, पायाभूत व्यवस्था (इन्फ्रास्ट्रक्चर) उभी करणाऱ्या योजनांवर सुरुवातीस भर द्यावा असे म्हणणारा एक प्रवाह होता. तर पायाभूत, अवजड उद्योगधंद्याच्या निर्मितीवर भर द्यावा ही म्हण तर दुसरा प्रवाह होता. या प्रवाहांससमोर सोविएत 'रशियाचे मॉडेल होते. खाजगी भांडवलदारांच्या हाती देशाच्या आर्थिक नाड्या सोपवाव्यात ही भूमिका भारतात स्वीकारली गेली नाही. शासनाचे नियंत्रण असावे, व त्यासाठी उद्योगधंद्याच्या व पायाभूत व्यवस्था उभारणीच्या क्षेत्रात पुरेशा प्रमाणात सरकारी मालकीच्या संस्थांचे प्रभुत्व प्रस्थापित करावे हे सर्वसामान्य धोरण होते. या चौकटीत खाजगी भांडवलाच्या विस्तार विकासाला वाव ठेवलेला होता. देश खाजगी भांडवलदारांच्या हाती दिल्याने आजची बेरोजगारी निर्माण झालेली आहे हे म्हणणे म्हणून योग्य नाही. सोविएत रशियाचे अनुकरण करून आर्थिक विकास केला काय किंवा शेती व उपभोगाच्या वस्तू उत्पादन करणाऱ्या उद्योगांना प्राधान्य देऊन तो केला काय, जोवर श्रमबचत करणाऱ्या भांडवलसघन उत्पादनतंत्रावर भरवसा राहील तोवर त्यातून बेरोजगारीची समस्या उत्तरोत्तर अधिकाधिक तीव्र होत जाईल ही गोष्ट नियोजनकारांच्या वा अर्थपंडितांच्या ध्यानात आली नाही: पाश्चात्य भांडवलशाही राष्ट्रे व सोविएत रशिया यांच्यापासून आपण चुकीचा बोध काढीत आहोत हे लक्षात आले नाही. त्या देशामध्ये दिसणाऱ्या 'पूर्ण रोजगारी''च्या चित्रांचे रहस्य भांडवलसंघन उत्पादन तंत्रप्रधान उद्योगांचा विस्तार हे नाही. नैसर्गिक साधनसंपत्ती व लोक संख्या यांचे विशिष्ट परस्परप्रमाण, देशातील स्वकीयांची व परदेशांची साम्राज्यवादी पिळवणूक आणि शस्त्रास्त्रस्पर्धा या तीन गोष्टींचा त्यांच्याशी संबंध आहे. सोविएत रशियाची आजची 'प्रगत' अवस्था स्वकीयांच्या दीर्घकालीन पिळवणुकीवर आधारलेली आहे. क्रांतीनंतरच्या काळात तेथील शासनाने सर्वांना रोजगार दिला असे म्हणण्यापेक्षा वेठबिगारीला जुंपले आणि प्रचंड पिळवणूक केली असें म्हणणे अधिक युक्त होईल. भांडवलशाही देशांच्या बाबतीत शोषण व व पिळवणुकीचा मुद्दा सर्वश्रुतच आहे.

सामुदायिक शेती हा बेरोजगारी लपविण्याचा एक हमखास उपाय होऊ शकतो ही गोष्ट येथे ध्यानात घेण्याची गरज आहे. साम्यवादी देशांमध्ये लोकानां आपल्या इच्छेनुसार स्थलांतर करण्यास सक्त मनाई असते. शेतीचे सामुदायिकीकरण केल्यावर शहरांतून नको असलेली माणसे सामुदायिक शेतांवर सक्तीने डांबून ठेवता येतात. तांत्रिकदृष्टया ती बेकार नसतातच, कारण शेतीवर त्यांना 'काम' असतेच, असे गृहीत धरता येते. भांडवलशाहीतली बेरोजगारी उठून दिसते; मी बेकार आहे असे म्हणायला, तसे वागायला माणसे मोकळी असतात. ती बेकार असलेली दिसू शकतात. साम्यवादी देशांमध्ये अशी मोकळीक असत नाही. सामुदायिक शेतीवर बरीच बेकारी दडविता येते. किंवा वेठबिगारीस जुंपून बेकारी 'हटविता' येते. पण वेठबिगारीला रोजगार म्हणण्यांची चूक आपण जर केली नाही आणि स्थलांतरावरचे कडक निर्बंध जर आपण लक्षात घेतले तर पूर्ण "रोजगारी"च्या चित्रामागील पिळवणूक व दडपणूक ध्यानात येईल.

हा एवढा विस्तार करण्याचे कारण काय? भारतीय अर्थव्यवस्थेवर भांडवलदारांची पकड आहे, येथील राज्यकर्ते भांडवलदारांचे बटीक आहेत, आणि बेरोजगारी व किमान' जीवनवेतनाचा अभाव हा त्यांच्या कुटील अर्थ व राजनीतिचा डाव आहे या स्पष्टीकरणातला सवंगपणा ध्यानात याचा. आजच्या राज्यकर्त्यांना सत्तेवरून खाली खेचून 'डाव्या'च्या हाती सत्ता सुपुर्द करणाऱ्या वर्गसंघर्षातून रोजगाराचा व किमान जीवनवेतनाचा हक्क जनसामान्यांत आपोआपच उपभोगावयास मिळू लागेल असा भ्रामक आशावाद मनात रूजू नये.

सत्तापरिवर्तन पुरेसे नाही. भारतात उद्या 'डाव्यां'ची सत्ता प्रस्थापित झाली आणि त्यांनी सर्व उत्पादन साधनांवर राज्यस्वामित्व प्रस्थापित केले अशी कल्पना करा. त्याने रोजगाराच्या वा जीवनवेतनविषयक स्थितीत काय फरक पडेल? आर्थिक विकासाच्या विषयाच्या उत्पादनतंत्रविषयीच्या भूमिकेत अंतर पडले नाही तर आजच्या स्थितीत फारसा फरक पडावयाचा नाही. इतकेच की यासंबंधी काही प्रश्न आहेत हे बोलण्याची मोकळीक राहणार नाही.

मुद्दा सत्तापरिवर्तनाचा नाही; व्यवस्थापरिवर्तनाचा आहे. रोजगारांचा व जीवनवेतनाचा हक्क प्रत्येक व्यक्तीस उपभोगता यावयाचा असेल तर प्रत्येकास काम जी मध्ये मिळेल अशी उत्पादनव्यवस्था उभारणे आवश्यक आहे. श्रमसघन उत्पादनतंत्रांचा व्यापक व सार्वत्रिक वापर केल्याखेरीज ही गोष्ट शक्य दिसत नाही. श्रमबचतप्रधान भांडवलसधन आधुनिक उत्पादनतंत्रे वापरल्याने औद्योगिक क्षेत्रात पुरेसा रोजगार उपलब्ध होऊ शकणार नाही. तेव्हां अशा बेरोजगारांच्या भू-सेना वा मजूर- सेना स्थापन करून त्यांच्या करवी श्रमनिष्ठ प्रकल्प हाती घ्यावेत व देशाच्या साधनसंपतीत व वस्तुगत भांडवल संचयात भर टाकावी अशा योजना मांडल्या गेल्या आहेत. उद्योगधंद्याच्या क्षेत्रात भांडवलसघन प्रगत उत्पादन तंत्र वापरीत राहूनही या मार्गाने सर्वांना रोजगार देता येत असल्यास, व तोही दोनचार वर्षे नाही तर प्रदीर्घ काळपर्यंत, त्याचाही विचार करावयास हरकत नाही. तसे करण्यासाठीही आजच्या सामाजिक व आर्थिक व्यवस्थेत अनेक मूलभूत बदल करावे लागतील. बाराही महिने शासनाने रोजगार हमीची कामे काढावीत ही मागणी गावोगावच्या गोरगरीबामध्ये मूळ धरीत आहे. अशी कामे देशभर सतत संघटित करावयाची झाल्यास व या मजुरांना जीवनवेतन द्यावयाचे झाल्यास नियोजनाचे अनेक रुष्ठ अग्रक्रम बदलावे लागतील. एक गोष्ट स्पष्टपणे व ठासून मांडावी लागेल. प्रत्येकास रोजगार व जीवनवेतन प्राप्त व्हावे यासाठी आवश्यकता पडली तर अनुरूप श्रमसघन उत्पादनतंत्रांचा व त्या तंत्रांना अनुरूप उत्पादन पद्धतीचा व व्यवस्थांचा अंगिकार केला पाहिजे. म्हणजेच आग्रह केवळ सत्तांतराचा ठेवून पुरेसे नाही तर अर्थव्यवस्थेचे उद्दिष्ट व अंतः सूत्र बदलण्याची मागणी केली पाहिजे.

शासनाने सर्वांना रोजगार पुरविला पाहिजे, जीवनवेतन दिले पाहिजे, किमान बेकारभत्ता तरी दिला पाहिजे, या मागण्या घेऊन प्रचलित शासनाविरूद्ध चळवळ संघटित करण्याची गोष्ट आज वेगवेगळे पक्ष व गट करीत आहेत. आजच्या सत्ताधाऱ्यांना सत्तेवरून खाली खेचून आपल्या हाती सत्ता घेण्याच्या डावपेचांचा भाग म्हणून राजकारणी मंडळींनी अशी चळवळ उभी करण्याची गोष्ट समज शकते. पण कोणत्या प्रकारच्या आर्थिक, राजकीय व सामाजिक व्यवस्थेत लोकांचे स्वातंत्र्य व स्वायत्तता अबाधित राहून जीवनवेतनासह रोजगार उपलब्ध होईल, या प्रश्नाचे उत्तर ही चळवळ देत नाही. पण, याचे स्पष्टपणे उत्तर दिले नाही, साऱ्या गोष्टी शासनावर सोपविल्या, व अमूक एका रंगाचे शासन प्रस्थापित झाल्याने हे सर्व घडून येणार आहे अशी भूमिका घेतली तर ते हुकूमशाहीला आमंत्रण असते ही गोष्ट ध्यानात घ्यावयास हवी.

हुकूमशाहीचा पर्याय ज्यांना अमान्य असेल त्यांनी रोजगाराचा व जीवन वेतनाचा हक्क प्रस्थापित करण्याची लोकचळवळ एकाच वेळी त्रिपदरी पद्धतीने संघटित करण्याची व चालविण्याची गरज आहे.

(१) रोजगार निर्माण करण्यासाठी योग्य ती धोरणे. अंगिकारावीत, कार्यक्रमाची अमंलबजावणी करावी. यासाठी शासनावर दडपण आणणे,

(२) ज्या प्रकाराच्या व्यवस्थेत सर्वांना रोजगार व जीवनवेतन उपलब्ध होईल त्या आर्थिक व्यवस्थेचे स्वरूप स्पष्ट करणारी प्रबोधनाची व त्यासाठी अनुरूप मूल्यपरिवर्तनाची चळवळ चालविणे, आणि

(३) लोक सहभागाधिष्ठित विधायक कर्तृत्वाच्या आधारे नवी व्यवस्था साकार करणारे उपक्रम प्रत्यक्ष राबविणे, असे तीन पदर त्या

चळवळीत असावे लागतील. (सर्व उत्पादन साधनांचे, रोजगारांचे स्वामित्व केंद्रीभूत शासनाच्या हाती देणारी आर्थिक औद्योगिक व्यवस्था मूलतःच हुकूमशाही स्वरूपाची असल्याने अशी व्यवस्था उचलून धरणे या लोकचळवळीशी सुसंगत असणार नाही. तसेच, 'श्रमिक सत्तेची केंद्रात स्थापना' (डिक्टेटरशिप ऑफ द प्रोलेटारियट) या प्रकारचे उत्तरही नव्या व्यवस्थेच्या संदर्भात अप्रस्तुत आहे. या दोन्ही गोष्टी ध्यानात ठेवल्या पाहिजेत.)

प्रचलित भांडवलशाही व साम्यवादी धर्तीची आर्थिक विकासाची मॉडेल्स नाकारूनच, एक वेगळे मॉडेल समोर ठेवूनच जीवन वेतनासह रोजगारीच्या हक्कप्रस्थापनेची चळवळ चालवली जावयास हवी ही प्राथमिक गरज आहे. भांडवलशाही अर्थव्यवस्थेशी संवादी लोकशाही राज्यव्यवस्था आणि साम्यवादी अर्थव्यवस्थेशी संवादी हुकूमशाही राज्यव्यवस्था या दोन्हीही अशाच बाद ठरतात. पहिलीत सर्वांना रोजगार व जीवन वेतन देणे ही जबाबदारी शासनाने अंगाबाहेर टाकलेली असते. शासन फार फार तर बेकारभत्ता देण्याची व्यवस्था करते तर दुसरीत लोकांच्या जीवनावरील सर्वकष नियंत्रणाद्वारे रोजगारी व जीवनवेतनाचा प्रश्न दडपून टाकला जातो.

सर्वंकष हुकूमशाही राज्यसत्तेच्या अंकित न व्हावे लागता जीवनवेतनासह रोजगाराचा हक्क लोकांना प्राप्त व्हावयाचा असेल तर ज्या काही तत्त्वांच्या आधारे अर्थव्यवस्थेची पुनर्रचना व्हावयास हवी त्याची स्पष्टता वर काही प्रमाणांत केली आहे. त्यात आणखी काही गोष्टींची भर टाकावी लागेल.

(१) कोणाचाही असलेला रोजगार काढून घेणारी, नष्ट करणारी 'सुधारणा' करण्याचा अधिकार व्यक्तीस वा समाजास नसला पाहिजे. उत्पादन व्यवस्थेत तांत्रिक प्रगती करावयाची असेल तर पर्यायी रोजगार दिल्यानंतरच ती केली पाहिजे. तसेच आधीच्या रोजगाराइतका तरी आत्मिक समाधान देणारा व वेतन देणारा तो दुसरा रोजगार असला पाहिजे.

(२) वस्तूंच्या किमती स्पर्धेने, बाजारात ठरता कामा नयेत. उत्पादक श्रमिकास योग्य जीवनमान लाभण्यासाठी आवश्यक त्या सर्व गोष्टी त्याच्या उत्पादनाच्या मोबदल्यात मिळतील अशा प्रकारे वस्तूंच्या विनिमयास केवळ सहाय्यभूत म्हणून किंमती ठरल्या पाहिजेत. परस्परांना वस्तू वा सेवा पुरवून समृद्ध जीवन निर्माण करण्याची जबाबदारी उत्पादक वा सेवक म्हणून प्रत्येकाने पार पाडावयाची हे तत्त्व स्वीकारले गेले पाहिजे.

(३) वरील तत्त्वातूनच आणखीही काही तत्त्वे निष्पन्न होतात. व्यापार हा वस्तू स्वस्तात मिळविण्यासाठी नसला पाहिजे. आपल्या समाजातील सर्वांच्या उपजीविकेचा व रोजगाराचा प्रश्न सोडविल्यानंतरच अतिरिक्त उत्पादनाच्या देवाणघेवाणीच्या स्वरूपात वा तो प्रश्न सोडविण्यासाठी आवश्यक म्हणूनच व्यापार करण्याचे तत्त्व स्वीकारले पाहिजे.

(४) सर्वांना जीवनवेतन व रोजगार उपलब्ध करून देण्यासाठीच जर अर्थव्यवस्था असेल तर सर्वांना जीवनवेतन मिळाल्याखेरीजच काही लोकांनी स्वतःसाठी जास्त मिळकत घेण्याचा विचार गैर ठरतो. माणसाला माणसा सारखे जगण्यासाठी काय व किती लागते याविषयीची कल्पना ही सांस्कृतिक-नैतिक स्वरूपाची असते. ती काळानुरूप बदलत असते. एक ठराविक रक्कम अशा स्वरूपात जीवनवेतनाची कल्पना पुढे ठेवता येत नाही. स्वाभाविकच जेथे सर्वांना जीवन वेतनाचा हक्क आहे असे म्हणण्याचाच अर्थ सरळपणे असाही होतो की अशा अर्थ व्यवस्थेची उभारणी सामाजिक व आर्थिक समतेच्या पायावर केली पाहिजे.

वरील तत्त्वे काळजीपूर्वक विचारात घेतली तर त्या तत्त्वावर आधारलेली अर्थव्यवस्था क्रांतिकारक परिवर्तनाखेरीज साकार होणार नाही ही गोष्ट लक्षात येईल. या क्रांतिकारक परिवर्तनाची सुरुवात राज्यक्रांतीने वा सत्तांतराने होऊ शकणार नाही. या परिवर्तनाची सुरुवात मूल्यपरिवर्तन, रूढी व प्रघात परिवर्तन संस्था परिवर्तन यांपासून व्हावी लागेल. यात जसा प्रस्थापित सत्ताधाऱ्यांशी समाजातील लब्धप्रतिष्ठितांशी संघर्ष करावा लागणार आहे, तसाच तो प्रस्थापित डाव्यांशीही करावा लागणार आहे. आणि गोरगरीबांना बेकारांना आत्मसंघर्षही करावा लागणार आहे. वर जी तत्त्वे नमूद केली आहेत त्या तत्त्वांना धरून आज गोरगरीबांचाही व्यवहार होत नाही.

हें परिवर्तन लोकांच्या अभिक्रमातून व कर्तृत्वातून घडून यावयाचे तर त्यासाठी लोकशिक्षणाचे व जागृतीचे काम तर करावे लागेलच.

त्याशिवाय संघटित आंदोलन उभे रहावयाचे नाही. पण लोकांच्या ठिकाणी विधायक पुरुषार्थही जागा करावा लागेल. केवळ सरकारकडे 'काम द्या नाहीतर भत्ता द्या' अशी मागणी करणारे मोर्चे नेणे, सरकारी अधिकाऱ्यांना घेराव करणे पुरेसे नाही. सामूहिक पुरुषार्थातून रोजगार निर्मितीचे प्रकल्पही हाती घेण्यास लोक पुढे आले पाहिजेत. शासनाबाहेर असलेल्या बुद्धिजीवी मध्यमवर्ग, व्यापारीवर्ग, कामगारवर्ग, इत्यादी विविध समाजघटकांच्या ठिकाणीही मूल्य व व्यवहार परिवर्तनाचे काम त्याखेरीज सुरू होणार नाही. एका वेगळ्या राज्यसत्तेच्या कृपेचा वा दडपशाहीचा भाग म्हणून नव्हे तर वेगळ्याच स्वायत्त समाजसंस्कृतीचा व व्यवस्थेचा भाग म्हणून जीवन वेतनासह रोजगार सर्वांना मिळण्यातच लोकांची शोभा व आत्मसन्मान आहे. त्यासाठी लोकांनी स्वतंत्रपणे व स्वायत्तपणे सामूहिक विधायक पुरुषार्थातून केवळ मूल्यपरिवर्तनच नाही तर नव्या संस्थांच्या उभारणीतून व्यवस्था परिवर्तन ही घडवून आणले पाहिजे.

**रोजगाराचा हक्क व समाज परिवर्तन एक चर्चा**

रमेश पाध्ये

***भारतातील बेकारी व अर्धबेकारीचे प्रमाण सतत वाढत आहे. स्वातंत्र्योत्तर काळात देशातील बेकारीचे व दारिद्र्याचे उच्चाटन करण्याचे उद्दिष्ट डोळयासमोर ठेवून नियोजनबद्ध आर्थिक विकासाचे आराखडे येथे आखण्यात आले. परंतु प्रत्यक्ष व्यवहारात मात्र राज्यकर्त्यांना हे उद्दिष्ट गाठता आले नाही. स्वातंत्र्योत्तर काळात भारताची आर्थिक विकासाच्या दिशेने थोडीफार वाटचाल झाली. उत्पादन तंत्र विकसित झाले. कारखानदारी वाढली, औद्योगिक उत्पादन वाढले, शेती उत्पादन वाढले. पण बहुसंख्य जनता मात्र विकासाच्या फायद्यांपासून वंचितच राहिली. याचे प्रमुख कारण म्हणजे पूर्वी गावाबाहेर जशी अस्पृश्यांची वस्ती असे त्याचप्रमाणे नव्या रचनेत बहुसंख्य जनता आर्थिक क्षेत्राबाहेर राहिली आहे. आर्थिक क्षेत्राबाहेर राहिलेले हे लोक कोण? या लोकांना ही अवस्था कशामुळे प्राप्त झाली? या लोकांना आर्थिक क्षेत्राच्या कक्षेत कसे आणता येईल? इत्यादी प्रश्नांच्या संदर्भात विचार करणे ही आवश्यक बाब आहे. वसंत पळशीकर यांनी झोतच्या जानेवारी व १५ फेब्रुवारीच्या अंकात 'जीवन वेतनासह रोजगाराचा मानवी हक्क आणि व्यवस्था परिवर्तन' या शीर्षकाच्या टिपणाद्वारे या दिशेने चर्चा सुरू केली आहे. प्रस्तुत लेखकाने या विषयाचा दुसऱ्या दृष्टीकोनातून विचार केला आहे.***

वसंत पळशीकरांची मांडणी सूत्ररूपाने पुढील प्रमाणे आहे. त्यांच्या मते खाजगी नफा वा सामाजिक वाढावा यात वाढ व्हावी या सूत्रावर अर्थव्यवस्थेची उभारणी केली जावू नये. कारण नफा वाढावा यासाठी यांत्रिकीकरण करण्यात येते व श्रमशक्तीचा कमीतकमी वापर केला जातो. अशारीतीने रोजगार वाढावा यापेक्षाही नफा वाढावा हे उद्दिष्ट डोळयासमोर ठेवल्यामुळे शेती व औद्योगिक क्षेत्रात पुरेशा प्रमाणात रोजगार वाढत नाही. तसेच त्यांच्या मते उत्पादन साधनाचे केंद्रीकरणही टाळले गेले पाहिजे. आर्थिक व सामाजिक विषमता असणाऱ्या समाजातही सर्वांना रोजगार मिळेल अशी व्यवस्था केली जाऊ शकते. अर्थात भारतात असा सर्वांना रोजगार उपलब्ध करून द्यायचा तर खेड्यातील गरीब कार माणसांचे समाधान होण्याएवढे अडीच ते तीन रुपये रोजाचे काम त्यांना नियमितपणे वर्षभर मिळाले पाहिजे. पारंपारिक सरंजामशाही रचनेत गावगाड्याच्या चौकटीत सर्वांना काम मिळण्याची व्यवस्था असे. परंतु त्या रचनेतील विषमता, तेथील तळच्या थरातील लोकांच्या वाट्याला येणारी अर्धगुलामी, लाचारी, व्यवसाय स्वातंत्र्याचा अभाव हे दोष नव्या व्यवस्थेत टाळले पाहिजेत.

अशा तऱ्हेने मांडणी करताना पळशीकरांनी त्यांची काही मते अत्यंत आग्रही पद्धतीने प्रतिपादन केली आहेत. उदाहरणार्थ त्यांच्या मते विषमता, अन्याय, दडपणूक व स्वातंत्र्याचा संकोच ही वैगुण्ये खाजगी मालमत्ताधिष्ठित भांडवलशाहीचीच अंगभूत वैशिष्ट्ये नाहीत. सोव्हिएट रशियामध्येही ही सर्व वैगुण्ये तेवढ्याच प्रकर्षाने आढळतात. त्यांच्या मते पाश्चात्य देशाचे अनुकरण करण्याच्या गुलामी वृत्तीमुळे भारतातील नियोजनकारानी एक विशिष्ट प्रकारचा आर्थिक विकासाचा आराखडा स्वीकारला. औद्योगिकरणाचा वेग वाढवून येथे बेकारी व दारिद्र्य या समस्यांचे उच्चाटन करता येईल असा बोध केवळ पाश्चात्य भांडवलशाही देशांच्या उदाहरणावरूनच नव्हे तर सोव्हिएट रशियापासूनही घेण्यात आला. परंतु सोव्हिएट रशियामध्ये आज दिसणाऱ्या प्रगतीसाठी शासनाने स्वकीयांची दीर्घकाळ पिळवणूक केली होती. तेथे बेकारांना सामुदायिक शेतीवर डांबून तांत्रिकदृष्ट्या त्यांना देण्यात आलेला रोजगार ही देखिल एक प्रकारची सक्तीची वेठबिगारच होय. या सर्व गोष्टी विचारात घेतल्या तर केवळ सत्तापरिवर्तनाची नव्हे तर समाज परिवर्तनाची गरज आहे हे लक्षात येते. या परिवर्तनासाठी चळवळ उभी केली पाहिजे. अशा रीतीने पुन्हा एकदा डाव्या वा उजव्या मार्गांना टाळून नवीन क्रांतीकारक मार्ग शोधण्याच्या प्रयत्नात पळशीकर आहेत असे मला वाटते.

श्रीयुत पळशीकरांना जीवनवेतनासह रोजगाराचा मानवी हक्क प्रस्थापित करायचा आहे. स्वातंत्र्योत्तर काळात झालेल्या आर्थिक प्रस्थापित करायचा आहे. स्वातंत्र्योत्तर काळात झालेल्या आर्थिक विकासामुळे धान्योत्पादनाच्या बाबतीत स्वयंपूर्ण झालेल्या भारतातील नागरिकांना किमान दोन वेळच्या जेवणाची भ्रांत असू नये या भूतदयावादी दृष्टिकोनातून पळशीकर बेकारीच्या प्रश्नाकडे पहात नसावेत. पारंपारिक पद्धतीची जुनी रचना, त्या व्यवस्थेतील विषमता, काही लोकांच्या वाट्याला येणारी अर्धगुलामी अवस्था, व्यवसाय स्वातंत्र्याचा अभाव व लाचारीचे जीवन यातून माणसांची मुक्तता व्हावी असे त्यांना वाटते. पण असे असले तर खेड्यातील बेकारांना निदान अडीच तीव्र रुपये वेतनाच्या रोजगाराची शाश्वती मिळाली पाहिजे असे विधान करायला ते कसे धजावतात? केवळ

दोन वेळच्या साध्या जेवणापुरते वेतन मिळेल अशा रोजगाराची शाश्वती लोकांना मिळाली पाहिजे अशी अल्पसंतुष्ट भूमिका ते कशी घेतात? आजची भारतीय अर्थव्यवस्था याहून चांगले जीवन पुरवण्यास असमर्थ आहे असे त्यांना वाटत असावे. मग अशावेळी आर्थिक विकासाला प्राधान्य द्यायला नको का?

**दारिद्र्याच्या उच्चाटनासाठी आर्थिक विकास आवश्यक**

सर्व लोकाना किमान जीवनमानाची शाश्वती प्राप्त करून द्यायची असेल तर त्यांना केवळ पैशाच्या स्वरूपात वेतन देऊन भागणार नाही; तर लोकांना मिळणाऱ्या मजुरीच्या पैशात बाजारात जीवनोपयोगी वस्तू विकत मिळतील याची शाश्वती निर्माण केली पाहिजे. आर्थिक विकासाचे हे उद्दीष्ट गाठायचे तर शेती व औद्योगिक अशा दोन्ही क्षेत्राचा विकास साधावा लागतो. उत्पादनतंत्र विकसित करायचे तर उत्पादन साधने सुधारावी लागतात. केवळ लोकांच्या भुकेचा प्रश्न केंद्रीभूत मानून अन्नधान्याचे उत्पादन वाढवायचे असले तरी उपलब्ध शेतीचे क्षेत्रफळ वाढवता येणार नसल्यामुळे मुख्यतः आधुनिक तंत्रज्ञान वापरून जमिनीची उत्पादकता वाढवावी लागते. तसे करायचे तर शेती विकासासाठीही औद्योगिक विकास आवश्यकच ठरतो. मग यासाठी भांडवल संचय करावा लागतो. यामुळेच नियोजनबद्ध विकास आराखड्यात एकूण राष्ट्रीय उत्पादनातील काही हिस्सा खर्च न करता राखून ठेवावा लागतो व त्याची गुंतवणूक करूनच उत्पादन साधने व उत्पादनतंत्र यांचा विकास करता येतो. यामुळेच नियोजनकारांना आपल्या आराखड्यात वाढावा निर्माण करण्याचे उद्दिष्ट अंतर्भूत करावेच लागते. वाढावा निर्माण केल्याशिवाय गुंतवणूक करता येत नाही व भांडवली गुंतवणूकीशिवाय आर्थिक विकास होऊ शकत नाही.

नफा ही संकल्पना जरा वेगळी आहे. एखाद्या उद्योगात होणारा नफा म्हणजे त्या उद्योगात जे नवीन मूल्य तयार झाले त्यातील कामगारांचा मजूरी म्हणून ठरविलेला हिस्सा दिल्यानंतर शिल्लक रहाणारी रक्कम होय. भांडवलदार ही रक्कम हवी तशी खर्च करू शकतात. नफा म्हणून भांडवलदारांच्या हातात गोळा होणाऱ्या रकमेतून ते महाल बांधू शकतात, मोटारी वा विमाने उडवू शकतात. यामुळेच भांडवलदार वर्गाच्या हातात नफा म्हणून शिल्लक रहाणाऱ्या रक्कमेएवढे राष्ट्रीय उत्पन्न शिल्लक पडत नाही व अर्थव्यवस्थेत एकूण नफ्या एवढी गुंतवणूक होऊ शकत नाही. यामुळेच वाढणाऱ्या नफ्याच्या रक्कमेएवढी गुंतवणूक वाढत नाही. एवढेच नव्हे तर आज नफा वाढला, परंतु भविष्यकाळात मागणी वाढणार नसेल व त्यामुळे उत्पादन वाढवून अधिक नफा मिळण्याची शक्यता नसेल तर गुंतवणूक कमी होते. म्हणूनच केवळ नफा वाढवणे हे नियोजनाचे उद्दिष्ट नसावे हे मान्य. परंतु ते तसे नसते ही.

**श्रमसघन उद्योग वाढवण्यास पडणाऱ्या मर्यादा**

भारतात नफ्याचे उद्दिष्ट ठेवल्यामुळे श्रमसघन उत्पादनतंत्राचा वापर केला जात नाही असा पळशीकरांचा आक्षेप आहे. त्यांच्या मते भांडवलाची टंचाई असते तेव्हा लोकांना काम नाही म्हणून बसवून ठेवण्यापेक्षा श्रमसघन उत्पादनतंत्रे वापरून त्यांना कामाला लावले पाहिजे. माणसाने कोणताही उद्योग केला नाही तरी जगण्यासाठी त्याला खायला लागतेच. त्यामुळे माणसांना रोजगार न देता श्रमशक्ती वाया घालवणे हे राष्ट्रीय नुकसान आहे. परंतु म्हणून सर्व क्षेत्रांमध्ये श्रमसघन उत्पादनतंत्र वापरता येणार नाही. किंवा तसे करणे सामाजिकदृष्ट्या किफायतशीर ठरणार नाही. उदाहरणार्थ, पोलाद कारखाने, रेल्वे वाहतूक, जल वाहतूक, आगपेट्या व बोटी बांधण्याचे कारखाने, रासायनिक खतांचे प्रकल्प, सिमेंटचे कारखाने अशा अनेक जड उद्योगांत दर कामगारामागे प्रचंड प्रमाणात भांडवली गुंतवणूक आवश्यक ठरते. पोलादाचा वा सिमेंटचा कारखाना श्रमसघन बनवता येत नाही व पोलाद, सिमेंट या सारख्या मूलभूत घटकांचे उत्पादन केल्याशिवाय उत्पादन साधने व उत्पादनतंत्र सुधारता येत नाही. त्यामुळेच केवळ खाजगी नफ्याचे उद्दिष्ट डोळयासमोर ठेवून केले जाणारे यांत्रिकीकरण टाळले पाहिजे असे विधान करणे हेच जास्त सयुक्तिक ठरेल असे मला वाटते.

शक्य तेवढे यांत्रिकीकरण टाळले गेले पाहिजे असे मान्य केले तरीही प्रचंड प्रमाणावर भांडवली गुंतवणूक करून देशात जड उद्योग निर्माण केले गेले. केवळ या कारणामुळे देशातील बेकारी वाढली हे खरे नाही हेही आपण लक्षात घेतले पाहिजे. जड उद्योग देशातील उत्पादन साधने व उत्पादन तंत्र सुधारण्याची केवळ शक्यता निर्माण करतात. देशात प्रचंड प्रमाणावर पोलाद निर्माण होऊ लागल्यामुळे, दरडोई सिमेंटची व विजेची उपलब्धता वाढल्यामुळे, मशीन टूल्स बनू लागल्यामुळे किंवा इंजिनियरिंग धंद्याचा विकास झाल्यामुळे खरे तर आज भारतातील शेतकरी शेतीसाठी पोलादाचा नांगर वापरू शकेल. धरणे बांधून, विहिरी खोदून, पंप वापरून शेतीला बारमाही पाणी पुरवठा करणे आता सुलभ होईल. देशाच्या एका भागात दुष्काळ पडला तर तेथे दुसऱ्या भागातून अन्नधान्य

नेण्याचे काम आता रेल्वे व ट्रक वाहतुकीमुळे वेगाने करता येईल. याचाच अर्थ समृद्ध जीवनाची शक्यता बाता खरी तर वाढली आहे. परंतु असे असूनही प्रत्यक्षात सामान्य माणसाचे जीवन मात्र पूर्वी एवढेच बकाल आहे. लागलेले शास्त्रीय शोध वझालेला औद्योगिक विकास यामुळे उत्पादन साधने व उत्पादन तंत्र सुधारण्याची केवळ शक्यता निर्माण झाली. परंतु प्रत्यक्ष व्यवहारात मुठभर लोक वगळता इतरांना त्याचा फायदा उठवता आला नाही. यामुळेच येथे अत्यंत विषम पद्धतीने विकास झाला, अशी ही कारणमीमांसा आहे. सार्वत्रिक विकासाच्या मार्गात येणारे अडथळे दूर केल्याशिवाय आता पुढे जाता येणार नाही. या स्थितीमुळेच हे अडथळे कोणते याचा आज नीट शोध घेतला पाहिजे.

**भांडवलदारी व्यवस्थेत सर्वांना रोजगार मिळू शकत नाही**

पळशीकरांच्या मते आर्थिक व सामाजिक दृष्ट्या अत्यंत विषम व्यवस्थेतही सर्वांना रोजगार मिळेल याची व्यवस्था केली जाऊ शकते. खांजगी मालमत्ता संबंध नष्ट केलेल्या सोव्हीएट रशियासारख्या साम्यवादी देशातही विषमता, अन्याय, दडपणूक व स्वातंत्र्याचा संकोच ही वैगुण्ये आढळतात. तेथे आर्थिक प्रगतीसाठी स्वकीयांची पिळवणूक भारतात नफ्याचे उद्दिष्ट ठेवल्यामुळे श्रमसधन उत्पादन तंत्राचा वापर करण्यात आली होती. तेथील सामुदायिक शेतीवर वेठबिगारी करावी केला जात नाही असा पळशीकरांचा एक आक्षेप आहे. त्यांच्या मते लागली होती इत्यादी इत्यादी. या विवेचनामागची पळशीकरांची aisamrat टंचाई असते तेव्हा लोकांना काम नाही म्हणून बसवून धारणा अशी आहे की, **खाजगी मालमसा संबंध, साधन संपत्तीचे विषम ठेवण्यापेक्षा श्रमसधन उत्पादन तंत्रे वापरून त्यांना कामाला लावले वाटप ह्या बाबी लोकांचा किमान जीवनमानाचा हक्क मान्य करण्याच्या पाहिजे. माणसाने कोणताही उद्योग केला नाही तरी जगण्यासाठी त्याला मार्गातील खरा अडथळा नाहीत.** पळशीकरांचा हा समज तसा प्रत्यक्ष खायला हे लागतेच. त्यामुळेच माणसांना रोजगार न देता श्रमशक्ती व्यवहारातील पुराव्यावर आधारित आहे. उदाहारणार्थ १९७२।७३ च्या दुष्काळानंतर महाराष्ट्र शासनाने ग्रामीण भागातील बेकारांना रोजगार हमी योजनेमार्फत काम पुरवण्याची व्यवस्था निर्माण केली आहे. नोकरदारांवर कर लादून त्या पैशातून बेकारांना दिवसाला तीन रुपये रोजावर कामाला ठेवता येते हे महाराष्ट्र शासनाने सिद्ध करून दाखवले तसेच भरपूर पीक येऊन अन्नधान्याचे साठे कुजू लागताच केंद्रसरकारनेही कामासाठी अन्न ही योजना सुरू केली आहे. देशात उगाचच भूकबळी होऊ नयेत असा भूतदयावादी दृष्टीकोन बाळगणाऱ्या सत्ताधाऱ्याचे वाटल्यास आपण कौतुक करावे. परंतु यामुळे विषम व्यवस्थेतही सर्वांना रोजगार मिळेल अशी व्यवस्था केली जाऊ शकते असे विधान करणे तात्विकदृष्ट्या बरोबर ठरत नाही. कारण भांडवलाची टंचाई 'नसली व उत्पादनाला भरपूर मागणी असली तरी अशा आर्थिक भरभराटीच्या काळातही सर्व लोकांना रोजगार देऊन, बेकारांची राखीव फौज नष्ट करण्याची चूक कोणत्याही भांडवलदारी देशात करण्यात आलेली नाही. बेकारांच्या राखीव फौजेच्या बळावरच कामावर असणाऱ्या मजूरांचा उत्पादनातील न्याय्य वाट्यासाठी सुरू असणारा वर्गसंघर्ष भांडवलदारांना काबूत ठेवता येतो. त्यामुळेच नफा म्हणजे वाटप न केलेले वेतन असे मानणाऱ्या डाव्या विचारसरणीच्या लोकांनी एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की खाजगी मालमत्ताधिष्ठीत भांडवलदारी देशात एकवेळ बेकारांना बेकारभत्ता देण्याचा उदारपणा भांडवलदार मान्य करील. पण बेकारीच्या प्रश्नाचे समूळ उच्चाटन करून स्वतःच्या पायाखालची जमिन गमावण्याची राजकीय चूक तो कधीच करणार नाही.

रशियासारख्या साम्यवादी देशात आर्थिक विषमता नष्ट झालेली नसली तरी ती खूपच कमी झाली आहे हे उजव्या विचारसरणीच्या aritrea मान्य करावे लागते. किंबहुना त्यामुळेच तेथे दडपशाही आहे, तेथे व्यक्तीस्वातंत्र्याची गळचेपी केली जाते, अन्याय केला जातो अशी हाकाटी सतत केली जाते. याचा अर्थ रशियात आज सर्वकाही समाः धानकारक आहे असे मला म्हणायचे नाही. परंतु त्याचबरोबर रशियन राज्यक्रांतीमुळे हुकूमशाही प्रस्थापित होण्याशिवाय काहीही झाले नाही असे जर कोणी म्हणू लागला तर ते बरोबर ठरणार नाही. खरे तर साम्यवादी तत्त्वज्ञान स्वीकारून रशियन समाजाने एका वेगळ्या मार्गाने प्रवास सुरू केला आहे. आजपर्यंत कितीही चुका झाल्या असल्या तरी त्यांनी आपली वाटचाल थांबवलेली नाही किंवा प्रतिक्रांती करून पूर्णपणे भांडवली विचारसरणी स्वीकारून भांडवलदारी मार्ग अनुसरलेला नाही. यामुळेच रशियन जनतेने क्रांती करून आजपर्यंत काय मिळवले यापेक्षाही भविष्यकाळात ते काय मिळवतात यावरच भावी मानवी वंशाचे भवितव्य अवलंबून आहे असे मला वाटते. अर्थात रशियात घडलेल्या चुका टाळायच्या असतील तर क्रांतीनंतरच्या काळा'तील धोरणांचा चिकित्सक पद्धतीने अभ्यास केला पाहिजे. अशा अभ्यासकाला सोव्हिएट व्यवस्थेतील वैगुण्ये जाणवतील. परंतु तरीही तो सोव्हिएट रशियातील व्यवस्था व भांडवलदारी व्यवस्था

एकाच परिमाणाने मोजू शकणार नाही असा माझा विश्वास आहे.

सोव्हिएट रशियाच्या आजच्या प्रगत अवस्थेसाठी पायाचे दगड बनलेल्या रशियन माणसांच्या भूतकाळातील कष्टांची आठवण होणे ही निश्चितच चांगली गोष्ट आहे. परंतु म्हणून त्या काबाडकष्टांना पळशीकर म्हणतात त्याप्रमाणे पिळवणूक म्हणता येणार नाही. कारण पिळवणूक करणे म्हणजे स्वतःच्या फायद्यासाठी दुसऱ्या व्यक्तींना राबवणे होय. आर्थिक विकासाचे उद्दिष्ट गाठण्यासाठी, उज्वल भविष्यकाळासाठी, आपल्या मुलाबाळांचे आयुष्य सुखी व्हावे यासाठी, सामाजिक मालकीची उत्पादन साधने निर्माण करण्यासाठी लोकांनी स्वेच्छेने व जाणीवपूर्वक राबणे ही पिळवणूक नव्हे. कोणत्याही अप्रगत देशाची अर्थव्यवस्था ही नेहमीच शेतीप्रधान असते. अशावेळी औद्योगिक विकास करायचा तर शेती क्षेत्रातील अनावश्यक ठरणाऱ्या लोकांना श्रम करण्यासाठी शेती शेताबाहेर काम द्यावे लागते. तसेच त्या लोकांना लागणारे अमान्यही शेतीवालाच पुरवावे लागते. अशा तऱ्हेने शेती क्षेत्राच्या बळावर प्राथमिक भांडवल संचय करावा लागतो. आज जगत असणाऱ्या कोणत्याही देशाला इतिहास क्रमात अशाच तऱ्हेने भांडवल संचय करावा लागला होता. अर्थात सोव्हिएट रशिया सोडून इतर भांडवलदारी राष्ट्रांनी. मागासलेल्या देशांत लूटमार करून अधिक वेगाने भांडवल संचय केला. मार्क्सवादी विचारप्रणाली स्वीकारल्यामुळे सोव्हिएट रशियाने या मार्गाचा अवलंब केला नाही. म्हणूनच सोव्हिएट जनतेला भांडवल संचयासाठी अधिक श्रम करावे लागले. याचा अर्थ, सहज शक्य असले तरीही दुसऱ्याचा खिसा न कातरता पैसे मिळवण्यासाठी स्वतः राजने है जसे आपण नैतिक कृत्य मानतो, तशाच प्रकारचा नैतिक व्यवहार सोव्हिएट रशियाने केला आहे. रशियन जनतेच्या दृष्टीने ही गोष्ट निश्चितच अभिमानास्पद आहे.

विकास क्रमाच्या एका टप्प्यावर, बदलत्या स्थितीमध्ये काही लोकांना काम न मिळणे ही तशी स्वाभाविक गोष्ट आहे. परंतु सोव्हिएट रशियामध्ये अशां बेकारांना केवळ बेकारभत्ता देऊन जगवण्यात आले नाही. तर उलट त्यांच्या श्रमशक्तीचा उपयोग करून भांडवल संचयाच्या प्रक्रियेला वेग देण्यात आला. त्यांच्या कामाचा त्यांना योग्य तो मोबदला देण्यात आला असला तर याला वेठबिगार म्हणता येणार नाही. केवळ सामर्थ्याचा वापर करून मोबदला न देता व्यक्तीला सक्तीने राबायला भाग पाडणे म्हणजेच वेठबिगार होय. क्रांती झाल्यानंतर रशियात असे करण्यात आलेले नाही. रशियात व्यक्तीस्वातंत्र्यावर मर्यादा का घालण्यात आल्या? साम्यवादी तत्त्वज्ञान व्यक्तीस्वातंत्र्याची संकल्पना अवास्तव मानते की एका विशिष्ट परिस्थितीचा भाग म्हणून आजपर्यंत व्यक्ती स्वातंत्र्याचा संकोच करण्यात आला? यासारख्या प्रश्नांची नीट चर्चा झाली पाहिजे. परंतु वसंत पळशीकरांनी त्यांच्या लेखात यास्वरूपाची चर्चा करण्याचा प्रयत्न केलेला नाही. यामुळेच एका बाजूला व्यक्तीवादी भांडवली तत्त्वज्ञान स्वीकारल्यामुळे होणारे दुष्परिणाम दाखवायचे तर दुसऱ्या बाजूला सामाजिक हित लक्षात घेवून व्यक्तीवादी तत्त्वज्ञानाला मुरड घातली गेली तर व्यक्तीस्वातंत्र्याची गळचेपी झाली म्हणून आक्रोश करायचा असा काहीसा प्रकार पळशीकरांनी केला आहे. तसेच हे करताना त्यांच्याकडून मूलभूत समस्येला बगल दिली गेली आहे असेच म्हणावे लागते:

**खाजगी मालकी हक्कांविषयी**

जीवनवेतनासह रोजगाराचा हक्क प्रस्थापित करू पाहणाऱ्यांचा साधन संपत्तीवरील खाजगी मालकी हक्क व आर्थिक विकास यांच्यातील संबंध नीट समजावून घेतला पाहिजे. समाजात खाजगी मालकीची साधन संपत्ती असली की व्याज, खंड व नफा या तीन-मार्गानी मालमत्तादार वर्गाना उत्पन्न मिळते व त्यांच्या हातात साधन संपत्ती गोळा होत जाते. यामुळे मूठभर मालमत्तादारांना राष्ट्रीय उत्पन्नातील सुमारे पन्नास टक्के उत्पन्न मिळते तर राहिलेल्या बहुसंख्य मजूरवर्गाला मजूरी म्हणून राष्ट्रीय उत्पन्नातील केवळ ५० टक्के उत्पन्नावर समाधान मानावे लागते.. उत्पन्नावर समाधान मानावे लागते. मुठभर भांडवलदारांच्या हातात जमा होणाऱ्या या प्रचंड प्रमाणावरील साधन संपत्तीमुळे

(१) भांडवलदार वर्गाकडून साधन संपत्तीची उधळपट्टी सुरू राहाते. यामुळे उत्पादनसाधनांच्या विकासाला - भांडवल गुंतवणुकीला - मर्यादा पडते. (२) भांडवलदारवर्ग चैनीच्या वस्तू बनवण्यासाठी गुंतवणूक करू लागतो. (३) गरीब लोकांच्या हातात क्रयशक्ती नसते त्यामुळे जीवनोपयोगी वस्तूंची मागणी घटते व त्यामुळे त्या क्षेत्रातील गुंतवणूक कमी होवू लागते. खाजगी नफा वाढावा या उद्देशाने व हातात एकवटलेल्या भांडवलाची गुंतवणूक करून वाढ करावी या उद्देशाने Hisar प्रधान गुंतवणूक वाढवण्यात येते. अशा रीतीने आर्थिक विका साच्या प्रत्येक आवर्तनाबरोबर ही प्रक्रिया अधिक जोराने पुढे रेटली जाते. उत्पादन साधने व साधन संपत्ती यांच्यावरील

खाजगी मालकी हक्कामुळे आर्थिक विकास प्रक्रियेला असे जे अनिष्ट वळण लागते ते नीट लक्षात घेतले पाहिजे.

भारतात संमिश्र अर्थव्यवस्था निर्माण करण्याचा प्रयत्न केला गेला. प्रस्थापित खाजगी मालमत्ता संबंधाना धक्का न लावता, खाजगी मालकीची साधन संपत्ती तशीच ठेवून पायाभूत उद्योगांची उभारणी सावं जनिक क्षेत्रांत करण्यात आली. त्यामुळे किफायतशीर नसणारी औद्योगिक क्षेत्रातील गुंतवणूक करण्याची जबाबदारी शासनाने उचलली तर कफायतशीर औद्योगिक क्षेत्र व संपूर्ण शेती व्यवसाय ही मालमत्तादारांच्या हाती सोपवण्यात आली. अशारीतीने एकूण व्यवस्थेवर भांडवली विचारसरणीचा प्रभाव अबाधित ठेवण्यात आला. अशा रचनेत आर्थिक विकासाचे उद्दिष्ट डोळयासमोर ठेवून नियोजनाचा आराखडा करता येत असला तरी प्रत्यक्ष व्यवहारात नियोजनाचे उद्दिष्ट गाठणे बरेच कठीण होऊन बसते. उदाहरणार्थ शासनाने बेकारांना श्रमप्रधान रोजगार उपलब्ध करून दिला व पैशाच्या रुपाने मजूरी दिली तरी हे मजूर जेव्हा पैसे घेऊन ग्राहक म्हणून बाजारपेठेत येतात व अन्नधान्य मागू लागतात तेव्हा भाववाढ टाळायची असेल तर अन्नधान्याचे उत्पादन वाढावे लागते. परंतु भारतातील शेतीक्षेत्र हे पूर्णपणे खाजगी मालमत्तादारांच्या हातात राहिल्यामुळे शेतात काय पिकवायचे व किती पिकवायचे हे ठरवण्याचा संपूर्ण अधिकार जमिनदार व श्रीमंत शेतकऱ्यांना मिळाला. अशा परिस्थितीत अन्नधान्याचे उत्पादन वाढवण्यासाठी नियोजनमंडळाने कितीही डोकेफोड केली तरी स्वतःच्या खाजगी फायद्याचा विचार करणारे शेतकरी गट सहजपणे आर्थिक नियोजनावर पाणी फिरवू शकले. सोव्हीएट रशियासारख्या सामर्थ्यवान राज्यसत्तेला शेतकऱ्यांच्या ह्या सामर्थ्याचा अनुभव आलेला आहे. त्यामुळे भारतात स्वतःला शेतकरी म्हणवून घेत जमिनदार बागायतदारांनी इतर सर्व वर्गांवर कुरघोडी केली तर नवल वाटण्याचे कारण नाही.

### मित्र शक्ती व शत्रु शक्ती ओळखा

आर्थिक व सामाजिक परिवर्तन केल्यावाचून जीवन वेतनासह रोज-" गाराचा मानवी हक्क प्रस्थापित होऊ शकणार नाही. आर्थिक व सामाजिक परिवर्तन करायचे तर त्यासाठी संघर्ष करावा लागणार हे उघडच आहे. या संघर्षात आपल्या बाजूने उभ्या राहू शकणाऱ्या मित्र शक्ती कोणत्या हे आपण निश्चित केले पाहिजे. भांडवली विचारसरणीच्या प्रभावामुळे आज काही सामजिक घटक आपल्या बाजूने लढाईत उतरणार नाहीत. यासाठी त्याना शत्रू समजण्याचे कारण नाही. त्यांचे राजकीय शिक्षण करून आपण त्यांच्याशी मैत्री जोडली पाहिजे. तसेच आपले काही हुषार विरोधकही वैचारिक गोंधळ निर्माण करून आपल्यात फाटाफूट करण्याचा व उगाच आपल्याशी संबंध जोडण्याचा प्रयत्न करतील. असे प्रयत्नही मोडून काढले पाहिजेत. यासाठी आपल्याला मार्गदर्शक म्हणून इतिहास उपयोगी पडू शकेल.

स्वातंत्र्योत्तर काळात भारतातील राज्यकर्त्यांनी शोषण करण्याचा एक मार्ग म्हणून जाणूनबुजून ही रचना निर्माण केलेली नाही हे खरे आहे. कारण आर्थिक समता व सामाजिक न्याय प्रस्थापित करण्याच्या उद्देशाने पंडित नेहरूंनी नियोजनाची मूहूर्तमेढ रोवली, परंतु असे असले तरीही नियोजन यशस्वी झाले व आर्थिक विकासाला गती प्राप्त झाली की मालमत्तादारांच्या गटाची ताकद कमी होतजाईल व हळुहळु सामाजिक स्थित्यंतराच्या प्रक्रियेस गती मिळेल यावरच नेहरूंची अखेरपर्यंत निष्ठा असावी. पंतप्रधान नेहरूंच्या धोरणाना उघडपणे विरोध कर प्याचे धाडस त्यावेळच्या कोणाही काँग्रेसवाल्यांत नव्हते, एवढी सत्ताधारी काँग्रेस पक्षावर त्यांची पकड होती. बहुधा यामुळेच मालमत्तादारांच्या वर्गाला नेस्तनाबूत करण्याच्या कार्यक्रमाला नेहरूंनी कधीही. प्राधान्य दिले नसावे. परंतु उघडपणे विरोध केला नाही तरी नेहरुंच्या धोरणाचा बोजवारा उडवण्याचे सामर्थ्य येथील मालमत्तादारांजवळ निश्चितच होते. खाजगी मालमत्ता हक्कांना धक्का न लावता उत्पादन संबंध कायम ठेवून आर्थिक विकास केला तर सत्ताधारी वर्गाची ताकद कमी होत नाही तर ती वाढते हेच सत्य भारतातील आर्थिक नियोजनाच्या कारकीर्दीने पुन्हा एकदा ओरडून सांगितले आहे. त्यामुळेच खाजगी मालमत्ता हक्काचा शेवट केल्यावाचून जीवन वेतनासह रोजगाराचा हक्क प्रस्थापित होणार नाही.

कष्टकरी जनतेने, बहुसंख्य लोकांनी एकूण समाजाच्या हितासाठी आर्थिक विकास प्रक्रियेचे नियंत्रण करणे म्हणजे हुकूमशाही प्रस्थापित करणे नव्हे. जनतेच्या किमान गरजा भागण्यापूर्वी, त्यांनी आजच्या काळाशी सुसंगत अशी राहाणीमानाची पातळी गाठण्यापूर्वी काही लब्धप्रतिष्ठिताना ऐश्वर्य भोगण्यास मनाई करणे हा व्यक्ती स्वातंत्र्याचा संकोच नव्हे. लोकांच्या जीवन विषयक गरजांची पूर्ती हेच उत्पादनाचे उद्दिष्ट असले पाहिजे. आर्थिक विकासप्रक्रिया लोकाभिमूख असली पाहिजे. हे करायचे जर जनतेला अधिकाधिक निर्णय स्वातंत्र्य मिळाले पाहिजे. व्यक्ती व्यक्तीतील स्पर्धेच्या जागी सहकार्य व व्यक्तीस्वातंत्याच्या ऐवजी सामाजिक

स्वातंत्र्याची प्रस्थापना झाली पाहिजे. राजकीय दृष्ट्या जागृत व पुढारलेली जनता सामुदायिकपणे या व्यवहारासाठी सिद्ध होउ शकते. परंतु जनतेच्या सामाजिक जाणिवा - वर्गीय जाणिवा जेव्हा विकसित झालेल्या नसतात तेव्हा जनतेला सामुदायिकरित्या सत्ता राबवता येत नाही. अशावेळी हुकूमशाहीचा धोका उद्भवतो. तो टाळायचा तर चळवळीने नवीन मूल्ये रुजवण्यासाठी परिश्रम केले पाहिजेत.

**रोजगाराचा हक्क व समाज परिवर्तन**

**वसंत पळशीकर**

झोतच्या १ ऑक्टोबर १९८० च्या अंकात रमेश पाध्ये यांनी 'रोजगाराचा हक्क व समाज परिवर्तन' या विषयावरील चर्चेला सुरुवात केली होती. पाध्ये यांचा तो लेख हा प्रस्तुत लेखकाच्या याच विषयावर झोतमधील लेखमालेचं टीकात्मक विश्लेषण होतं. खालील लेखात पळशीकरांनी पाध्यांच्या आक्षेपांना उत्तरं दिली आहेत.

आर्थिक विकासाला प्राधान्य द्यायचे तर काय काय करायला हवे याविषयी पाध्ये यांनी आपल्या लेखात विवेचन केले आहे. तिथून चर्चा पुढे नेता येईल. सर्व लोकांना किमान जीवनवेतनाची शाश्वती प्राप्त करून द्यावयाची तर शेती व औद्योगिक अशा दोन्ही क्षेत्रांत विकास करावा लागतो. उत्पादन तंत्रे आणि उत्पादन साधने यांचा विकास त्यासाठी आवश्यक आहे. आणि भांडवल गुंतवणुकीशिवाय तो घडून येऊ शकत नाही. गुंतवणूक करावयाची तर भांडवल संचय असला पाहिजे. त्यासाठी वाढावा निर्माण केल्याशिवाय भागत नाही. नियोजनबद्ध विकासात म्हणूनच वाढावा निर्माण करण्याचे उद्दिष्ट अंतर्भूत करावेच लागते असे त्यांनी म्हटले आहे.

या मांडणीत एक दुवा निखळला आहे आणि तो अतिशय महत्त्वाचा आहे. किमान जीवन वेतन मिळण्याआधी माणसांना काम मिळायला हवे. म्हणजे शेती व औद्योगिक क्षेत्रांचा विकास सर्वांसाठी रोजगार उपलब्ध करण्याचे पथ्य सांभाळून होण्याची गरज आहे. विकासाच्या ज्या भूमिकेत हे पथ्य स्वीकारलेले वा सांभाळलेले नसेल ती भूमिका अव्हेरली पाहिजे. उत्पादनतंत्रे आणि साधने यांचा विकास ही सामाजिक उद्दिष्टांशी न जोडलेली केवळ तांत्रिक अशी बाब नसावी.

वरील मांडणीत हा दुवा जोडून घेतला तर वाढाव्याबद्दलची भूमिकाही कशी बदलते, हे पहाणे फार महत्त्वाचे आहे. शेतीच्या विकासासाठी पोलादाचे, सिमेंटचे कारखाने आवश्यक आहेत, खतांचे कारखाने आवश्यक आहेत, त्यासाठी खनिज तेलाच्या विहिरी खोदण्याची, तेल-शुद्धीकरणाच्या कारखान्यांची आवश्यकता आहे. या सगळ्यासाठी प्रचंड प्रमाणात भांडवली गुंतवणूक आवश्यक आहे. पाध्ये यांची ही मांडणीच येथे उदाहरणादाखल घेऊ. आजच्या पद्धतीत काय होते, ते पाहू. खेड्यातली शेती आणि ती पिकविण्यात सहभागी असलेले व शेतीवर अवलंबून असलेले लोक यांच्या वास्तवातील संबंधांकडे पाहिले तर काय दिसते? उत्पादन प्रक्रियेत सहभागी असूनही अनेकांना रास्त हिस्सा नाकारला जातो आणि अनेकांना आधी रोजगाराच्या संधीच न ठेवून मग हिस्सा नाकारला जातो व दुसरीकडे शेतमाल गावाबाहेर जाऊन भांडवलसंचयासाठी वाढावा उत्पन्न करतो. रशियासारख्या साम्यवादी देशामधून काय झाले? पाध्ये काय लिहितात? सोव्हिएत रशियाच्याच संदर्भात स्पष्टीकरण करताना ते लिहितात, "शेती- क्षेत्राच्या बळावर प्राथमिक भांडवलसंचय करावा लागतो. सोव्हिएट जनतेला भांडवल, संचयासाठी अधिक श्रम करावे लागले". सोव्हिएट जनता 'जाणीवपूर्वक व स्वेच्छेने' राबली असे पायें म्हणतात, त्याचा विचार आपण नंतर करू. पण त्यांच्याही लिहिण्यात आडवळणाने ही कबुली येऊन जाते की रास्त हिस्सा न देऊन वा अधिक श्रम करायला प्रवृत्त करून भांडवलसंचय केला गेला.

प्रत्येकास किमान रोजगार व जीवनवेतन यांची शाश्वती देऊनच भांडवल संचयाची गोष्ट करावयाचे पथ्य स्वीकारल्यास प्रारंभीच्या एका दीर्घ कालखंडात, भारतासारख्या लोकसंख्या मोठी असलेल्या देशात, कोणती भूमिका घ्यावी लागेल? शेतीचे उत्पादन वाढविण्यासाठी जर साधनांचा व तंत्राचा विकास करावयाचा तर (१) जो विकास श्रमातून करता येईल त्यासाठी यांत्रिक साधने वापरू नयेत, (२) असा विकास करण्याच्या ओघात रोजगार व नविन वेतन पुरविण्याच्या शक्यता कमाल प्रमाणात मूर्त कराव्यात, आणि (३) लोकांना काम व जीवनवेतन याबद्दल आग्रह राखल्याने भांडवलसंचयाच्या वेगावर म्हणजेच वाढाव्याच्या निर्मितीवर पडणाऱ्या मर्यादा स्वीकाराव्यात, ही भूमिका घ्यावी लागेल.

शेतीचे उत्पादन वाढविण्यासाठी पोलाद - सिमेंटचे, रासायनिक खतांचे कारखाने, वीजनिर्मिती आणि प्रचंड धरणे, अशा गोष्टींपासूनच सुरुवात करायला लागते यासारखी गृहीतकृत्ये तपासून घ्यावी लागतील. पाध्ये यांच्या मांडणीत याची तयारी मला दिसत नाही. तंत्रविज्ञान, उत्पादनतंत्रे आणि साधने यांनाही विवक्षित सामाजिक संदर्भ व ऐतिहासिकता असते याची दखल घेण्याची नितांत गरज आहे. ही गोष्ट लक्षात घेऊनच "प्रत्येकास रोजगार व जीवनवेतन प्राप्त व्हावे यासाठी आवश्यकता पडली तर अनुरूप श्रमसघन उत्पादनतंत्रांचा व त्या तंत्रांना अनुरूप उत्पादनपद्धतीचा व व्यवस्थांचा अंगिकार केला पाहिजे" असे प्रतिपादन मी केले.

'सामाजिक वाढावा' हे शब्द मी मूळ लेखात मुद्दामच अवतरण चिन्हात घातले. खाजगी मालमत्ता नष्ट करून जेव्हा शासन उत्पादनसाधनांवर राज्यस्वामित्व प्रस्थापित करते आणि उत्पादन व्यवस्थेचा ताबा घेते तेव्हा नफा या शब्दाऐवजी 'सामाजिक वाढावा' हा शब्दप्रयोग केला जातो. त्यामागे शोषण व पिळवणूक या गोष्टी पुष्कळदा, किंबहुना बहुतेक वेळा, दडविल्या जातात. नफा ही संकल्पना स्पष्ट करताना पाध्ये लिहितात, "एखाद्या उद्योगात होणारा नफा म्हणजे त्या उद्योगात जे नवीन मूल्य तयार झाले त्यातील कामगारांचा मजूरी म्हणून ठरविलेला हिस्सा दिल्यानंतर शिल्लक राहणारी रक्कम होय". उद्योग राज्यसत्तेच्या मालकीचा असतो तेव्हाही या व्याख्येनुसार नफा केला जात असतो असे वास्तविक म्हटले पाहिजे. तसे म्हटले तर मग राज्यस्वामित्वाचाही व्यवहार डोळसपणे व परखडपणे तपासला जाईल. पण व्यवहार वरील व्याख्येनुसार राहूनही राज्यसत्ता व तिचे पुरोहित 'सामाजिक वाढावा' असा वेगळा शब्दप्रयोग करतात कारण त्यात त्यांची सोय असते. 'सामाजिक वाढावा' म्हटले की राज्यसत्तेने त्याचा विनियोग कसाही केला तरी त्याचे आपसूकच जणू समर्थन होते. स्वामित्व राज्यसत्तेचे असले तरी, आणि 'सामाजिक वाढावा' हे शब्द वापरले तरी कसोटी बदलण्याचे कारण मला दिसत नाही. या दृष्टीने 'सामाजिक वाढावा' वाढविण्याच्या सूत्रावर अर्थव्यवस्थेची उभारणी नसली पाहिजे असे मी मूळ लेखात म्हटले आहे. नफा वा 'सामाजिक वाढावा' व पर्यायाने भांडवल संचयच नको असे मला म्हणावयाचे नाही.

"सर्वच क्षेत्रांमध्ये श्रमसघन उत्पादनतंत्र वापरता येणार नाही." या पाध्यांच्या विधानाला आक्षेप घेण्याचे कारण नाही. पण थोडीशी फेरमांडणी करून मला माझा मुद्दा मांडता येईल. प्रत्येकास रोजगार व जीवनवेतन मिळण्याच्या दृष्टीने प्रत्येक क्षेत्रात उत्पादन तंत्रे, साधने, प्रक्रिया व व्यवस्था याबाबतीत आवश्यक व शक्य त्या कमाल प्रमाणात श्रमसघनतेवर आग्रह धरण्यात यावा व त्या दिशेने तंत्रवैज्ञानिक विकास साधावा असे म्हणता येईल.

“खाजगी मालमत्ता संबंध, साधन संपत्तीचे विषम वाटप ह्या बाबी लोकांचा किमान जीवनमानाचा हक्क मान्य करण्याच्या मार्गातील खरा अडथळा नाहीत" अशी माझी धारणा आहे असे पाध्ये म्हणतात.

'खाजगी मालमत्ता संबंध' हा शब्दप्रयोग नीट स्पष्ट केला पाहिजे. दुसऱ्याचे श्रम विकत घेऊन त्याला कामाला लावता येण्याच्या प्रमाणावरील उत्पादन साधनांवरील खाजगी मालमत्ता इतका अर्थ या शब्दप्रयोगात अध्याहृत आहे. याहूनही अधिक नेमकी मांडणी शेतीच्या क्षेत्रात करता येईल व ती इतरत्रही लागू करता येईल. अनेक शेतकऱ्यांना शेतीतील काही क्रियांसाठी कुटुंबाबाहेरील व्यक्तींच्या श्रमांची जोड घ्यावी लागते. त्यासाठी मजुरीही दिली जाते. ही व्यवस्था आणि जमीनदार सालाने व कायम रोजीने मजूर ठेवून शेती पिकवितो ही व्यवस्था यात अंतर आहे. जमिनीची खाजगी मालकी दोन्ही व्यवस्थां मध्ये आहे. पण शोषण, पिळवणूक, नफ्यासाठी उत्पादन या संदर्भात 'खाजगी मालमत्ता संबंध' हा शब्दप्रयोग दुसऱ्या प्रकारच्या व्यवस्थेला उद्देशून वापरला जाणेच इष्ट आहे.

"उत्पादनसाधनांच्या मालकीचे खाजगी हातांमध्ये वा शासकीय यंत्रणेच्या हाती केंद्रीकरण होता कामा नये" असे मी मूळ लेखात म्हटले आहे. खाजगी मालमत्ता संबंध हा जर स्वयं रोजगार निर्मितीच्या मर्यादेत मूलतः व प्राधान्येकरून राहिला तर तो अडथळा बनतो असे मला दिसत नाही. आणि म्हणून केंद्रीकरणावर, ज्यात अनेकजण उत्पादन साधनविहीन बनतात त्या प्रक्रियेवर व व्यवस्थेवर मी माझ्या मांडणीत जोर दिला आहे.

पाध्ये यांनी माझ्या म्हणण्याचा विपर्यास केला आहे.

आर्थिक व सामाजिकदृष्ट्या अत्यंत विषम व्यवस्थेतही सर्वांना रोजगार मिळण्याची व्यवस्था केली जाऊ शकते. हिटलरच्या व्यक्तित्वाचा आणि त्याला प्रतिसाद देणाऱ्या सर्वसाधारण माणसांच्या मानसाचा, आणि व्यापक वैचारिक-सांस्कृतिक संदर्भाचा सखोल शोध घेणारा एक दीर्घ चित्रपट अलीकडे पाहण्यात आला. त्यात एके ठिकाणी येणारे भाष्य मला अर्थपूर्ण वाटले: “हिटलरच्या जर्मनीत फांशी देण्याचे काम करणारेही बेकार नव्हते." पारंपारिक भारतीय समाजव्यवस्थेतही सर्वांना रोजगार (विहित कर्मे) नेमून दिलेले असतच.

पाध्ये यांनी केलेले पुढील विधान तपासून पाहू. "बेकारांच्या राखीव फौजेच्या बळावरच कामावर असणाऱ्या मजूरांच्या उत्पादनातील न्याय्य वाट्यासाठी सुरू असणारा वर्गसंघर्ष भांडवलदारांना काबूत ठेवता येतो". वर्गसंघर्ष काबूत ठेवण्याचे इतरही मार्ग आहेत.

एकाधिकारवादी राज्यसत्ता प्रस्थापित करणे, सामाजिक-सांस्कृतिकदृष्ट्या अनिष्टः गणल्या जाणाऱ्या परदेशी श्रमिकांची देशात आयात करणे, श्रमिकांमध्येही सामाजिक दर्जा व प्रतिष्ठा या विषयी आग्रह रूजविणे (ज्यातून तेच इतर श्रमिकांच्या न्याय्य मागण्यांच्या विरोधी भूमिका घेतात, विषमता कायम ठेवण्याचा आग्रह धरतात ), इत्यादी.

भांडवलशाही व्यवस्थेवरच आघात करून मी थांबत नाही. भांडवलशाही व्यवस्था हा अडथळा तर मी स्पष्ट केला आहेच. पण पुढ जाऊन मी असे म्हणतो की उत्पादन साधनांचे स्वामित्व राज्य सत्तेच्या हाती हवाली केल्याने अडथळा दूर होत नाही. कारण खरा अडथळा उत्पादनसाधनांच्या केंद्रीकरणाचा आहे.

हे माझे म्हणणे पाध्ये यांना न मानवणारे आहे कारण ते त्यांच्या पोथीनिष्ठ साम्यवादी भूमिकेला छेद देणारे आहे. सोव्हिएत रशियाची त्यांनी केलेली भलावण ही म्हणून समजण्यासारखी आहे. त्याच मुद्याकडे आपण आता वळू या.

रशियन माणसांनी क्रांतीनंतरच्या काळात काबाडकष्ट केले हे पाध्ये यांनाही नाकबूल नाही. "आर्थिक विकासाचे उद्दिष्ट गाठण्यासाठी, उज्ज्वल भविष्यकाळासाठी, आपल्या मुलांबाळांचे आयुष्य सुखी व्हावे यासाठी, सामाजिक मालकीची उत्पादन साधने निर्माण करण्यासाठी लोकांनी स्वेच्छेने व जाणिवपूर्वक राबणे ही पिळवणूक नव्हे." असे ते लिहितात. पुढे ते असे लिहितात, "सोव्हिएट रशियामध्ये ... . (बेकारांच्या) श्रमशक्तीचा उपयोग करून भांडवल संचयाच्या प्रक्रियेला वेग देण्यात आला. त्यांच्या कामाचा त्यांना योग्य तो मोबदला देण्यात आला असला तर याला वेठबिगारी म्हणता येणार नाही. केवळ सामर्थ्याचा वापर करून मोबदला न देता व्यक्तीला सक्तीने राबायला भाग पाडणे म्हणजेच वेठबिगार होय. क्रांती झाल्यानंतर रशियात असे करण्यात आलेले नाही.”

क्रांतीनंतर रशियात बोल्शेविक पक्षाची एकपक्षीय हुकूमशाही सत्ता प्रस्थापित झाली ती आजतागायत टिकवून धरण्यात आलेली आहे. 'एका विशिष्ट परिस्थितीचा भाग म्हणून आजपर्यंत व्यक्तीस्वातंत्र्याचा संकोच करण्यात आला' अशी कबुली पाध्ये यांनीच दिली आहे. अशा स्थितीत स्वेच्छेने व जाणीवपूर्वक वागणूक झाली असे म्हणावयास खरोखर जागा उरत काय? ज्यांना स्वेच्छेने व जाणीवपूर्वक तसे वागावयाचे नव्हते त्यांना मोकळीक देणयात आली नसेल तर 'केवळ सामर्थ्याचा वापर' हेच शब्दप्रयोग अधिक योग्य ठरत नाहीत काय? लोकांना त्यांच्या कामाचा योग्य मोबदला मिळाला हे ठरविण्याची कसोटी कोणती? खाजगी मालमत्तासंबंध नसणे हीच पुरेशी कसोटी ठरते काय? श्रमशक्तीचा उपयोग करून भांडवल संचयाच्या प्रक्रियेला वेग तेव्हाच देता येतो जेव्हा माणसे जादा श्रम करतात किंवा त्यांच्या श्रमातून उत्पादन झालेल्यातला मोठा हिस्सा काढून घेतला जातो. एरवी भांडवलसंचय झाला तरी तो मंद गतीन होईल, आणि तो व्यक्तींकडून केला जाईलच असे नाही. ज्या व्यवस्थेत सर्व निर्णयांचे आत्यंतिक केंद्रीकरण झालेले असते तथे पाध्यांच्या विधानाचा अर्थ एकच होतो : राज्यसत्तेने निर्णय घेऊन लोकांना कामास जुंपल. आता, राज्यसत्ताधारी पक्ष स्वतःस श्रमिकांची हुकूमशाही स्थापन करणारा व्हॅनगार्ड म्हणवतो ही गोष्ट लोकांनी स्वेच्छेने व जाणिवपूर्वक केल्याचा पुरावा मानावयाचा काय?

सर्वंकष एकपक्षीय हुकूमशाही राजवट प्रस्थापित झालेल्या देशात जर अशी राजवट साठ-पासष्ट वर्षांनंतरही टिकविण्याची गरज राज्य कर्त्यांना भासत असेल तर किमान इतके तरी खचितच स्वयंसिद्ध आहे की 'स्वेच्छापूर्वक व जाणिवपूर्वक' तेथे गोष्टी घडत नाहीत. सर्व गोष्टी तेथे नियोजनपूर्वक व राज्यसत्तेच्या सामर्थ्याचा वापर करून घडविल्या जातात. अशा सामर्थ्याच्या वापरालाच उद्देशून "सामाजिक हित लक्षात घेऊन व्यक्तिवादी तत्त्वज्ञानाला मुरड घातली गेली" असे पाध्ये म्हणतात तेव्हा ते सार्वत्रिक प्रमाणावरील प्रच्छन्न व उघड वेठबिगारीवर पांघरूण घालतात, दुसरे काय?

"आर्थिक व सामाजिक परिवर्तन केल्यावाच न जीवनवेतनासह रोजगाराचा मानवी हक्क प्रस्थापित होऊ शकणार नाही, " हे केवळ पाध्ये यांचे मत नाही ते माझेही मत आहे. त्यासाठी संघर्ष करावा लागणार हेही उघड आहे. पण हा संघर्ष ' खाजगी मालमत्ता संबंधाच्या जागी उत्पादनसाधनांवर राज्यस्वामित्व व राज्यसत्तेच्या हाती केंद्रीकरण' प्रस्थापित करण्यासाठी असून उपयोगी नाहीं. कारण अशा परिवर्तनानंतर हक्क बजावण्याच्या बाबतीत श्रमिकांची कोंडी कोणत्याच अर्थाने कमी होत नाही. ती उलट फार वाढते, कारण सर्वशक्तिमान राज्यसत्तेशी टक्कर ही अधिक अवघड व जीवघेणी असते. आगीतून उठून फुफाट्यात पडण्यासारखी ती गोष्ट होईल.

स्वतःला रोजगार मिळविता येईल अशा उत्पादन साधनांपासून आणि साधनसंपत्तीपासून माणसाला व्यक्तिगतरित्या वा सामूहिकरित्या वंचित कोणी करू शकत नाही अशी व्यवस्था निर्माण करण्याची गरज आहे आणि ती विकेंद्रीकरणाच्या सूत्रावर व श्रमनिष्ठेच्या

मूल्यावरच प्रस्थापित होऊ शकते, केंद्रीभूत मालकी व अधिकाधिक श्रमबचत करण्याच्या तत्वावर संघटित केलेल्या तंत्रविज्ञानाच्या आधारावर प्रस्थापित होऊ शकत नाही. खाजगी मालमत्ता की राज्यस्वामित्व असा पर्याय खरा नाही तर, कोणत्या मर्यादितील खाजगी मालमत्ता, कोणत्या मर्यादितील राज्यस्वामित्व आणि कोणत्या मर्यादितले अन्य प्रकारचे सामूहिक स्वामित्व हा खरा प्रश्न आपणास सोडवायचा आहे.

या प्रश्नाची सोडवणूक ज्या सूत्राच्या आधारे करता येईल ते मांडणावर आघात करणाऱ्या व्हायला हव्यात. ण्याचा प्रयत्न परत एकवार करतो.

कोणतीही समाजव्यवस्था ही केवळ लिखित कायदेकानू आणि शास नाची दंडसत्ता यांच्या आधारे उभी नसते. समाजात सार्वत्रिक मान्यता असलेली मूल्ये, समजुती, रीतीरिवाज यांचाही तिला आधार असतो. किंबहुना असे म्हणता येईल की माणसांचे कर्तेपण आणि त्यांची सृजनशीलता अक्षय राहावयाची असेल तर लिखित कायदेकानू आणि शासकीय दंडसत्तेपेक्षाही मूल्ये, समजुती व रीतीरिवाज यांचा आधार अधिक पायाभूत असायला हवा.

रोजगार आणि जीवनवेतन हा प्रत्येक माणसाचा मूलभूत हक्क आहे - असे म्हणून पुरेसे नाही. हा हक्क शासनाने किंवा 'समाजाने' त्याच्या पदरात टाकावा अशी मागणी आपण करतो तेव्हा एकप्रकारे आपण व्यक्तीला शासनाच्या वा 'समाजा'च्या अंकित बनवतो. त्या परिस्थितीत हक्क केवळ कागदावर राहतो, तो मला उपभोगीवयास मिळेल की नाही ही गोष्ट अधिक शक्तिमान अशा दुसऱ्या परक्या यंत्रणेवर अवलंबून राहते.

हक्क मला व्यक्तिशः वा लहान समूहाच्या पातळीवर बजावता यायचा असेल तर त्यासाठी दोन गोष्टींची आवश्यकता आहे. माझ्या हक्क बजावण्याच्या आड समाजातील बलदंड व्यक्ती वा यंत्रणा उभ्या राहू शकणार नाहीत इतकी काही गोष्टींना सार्वत्रिक मान्यता असली पाहिजे, तो रूढ रिवाज बनलेला असला पाहिजे. दुसरी गोष्ट, व्यक्तीला वा लहान समूहांना हक्क आपल्या आपण बजावता येईल अशी समाजाची संरचना असली पाहिजे.

उत्पादनसाधनांचे केंद्रीकरण करणारा मालमत्ता संबंध, केंद्रीभूत व विराट प्रमाणावर प्रमाणित वस्तूंचे उत्पादन करणारी यंत्रे व तंत्रे आणि शासनाच्या हाती वाढणारी सर्वकष सत्ता ही एक एकात्म आणि परस्परसंबंधित व्यवस्था आहे. या व्यवस्थेत काही मूठभरांच्या हाती सर्वांच्या जीवनाच्या नाड्या येतात. ही व्यवस्था 'खाजगी मालमत्ते'च्या सूत्राला धरून अस्तित्वात आली, पण खाजगीच्या ऐवजी शासकीय ('सामाजिक') असा बदल केल्याने त्यात होणारे परिवर्तन मूलगामी स्वरूपाचे ठरत नाही; सर्वकष केंद्रीकरणाच्या दिशेनेच पावले पुढे पडतात.

साधनसंपत्ती (यात निसर्गातील साधनसंपत्ती, उत्पादनसाधने, भांडवल, ज्ञान, या सर्व गोष्टी आल्या) ही कोणाच्या मालकीची नसते, त्या साधन संपत्तीचा उपयोग करून न्याय्य उपजीविका मिळविण्याचा खुला अधिकार सर्वांना आहे, साधनसंपत्तीशी माणसांचा संबंध मालकाचा नसून विश्वस्ताचा आहे, ही धारणा नव्या समाजव्यवस्थेचा पायाभूत आधार आहे. याच्या आड कोणती गोष्ट प्रकर्षाने येते? तर निर्णय सत्तेचे व प्रशासनाचे केंद्रीकरण. हे केंद्रीकरण राजकारण, धर्मकारण, अर्थकारण इत्यादी सर्वच क्षेत्रात अस्तित्वात आले व वाढत गेले ते निसर्गनियमांनुसार नाही. माणसांच्या धारणा आणि आकांक्षा आणि पूर्वपीठिका यांच्याशी निगडीत अशी ऐतिहासिकता त्यात निगडीत आहे. इतरांना अंकित करून मी सर्वशक्तिमान व्हावे, मोठे व्हावे, माझा उपभोग जास्त वाढावा ही आकांक्षा ज्यांची होती त्यांनी केंद्रीकरणाच्या दिशेने वाटचाल करीत राहावे ही अगदी स्वाभाविक, बुद्धिप्रामाण्याला धरून होणारी गोष्ट आहे. प्रत्येकच माणसाचे व्यक्तित्व समाजत्वाने सर्जनशील व्हावे, बहरावे ही आकांक्षा बाळगणाऱ्यांच्या कृती, केंद्रीकरणावर आघात करणाऱ्या व्हायला हव्यात.

साम्यवादी देशात रूढ असलेल्या 'सामाजिक मालकी'चा पुरस्कार करणारे बोलत काही असले तरी व्यवहारात जुन्याच आकांक्षा बाळगणारे आहेत असे मला वाटते. या देशांमधली परिस्थिती पाहिली तर अनेक बलदंड खाजगी भांडवलदारांच्या जागी एकमेव सर्वकष शासनाची स्थापना करून त्या शासनाची सूत्रे आपल्या पक्षाच्या हाती मक्तेदारीने ठेवून मूठभर व्यक्ती सत्तावान, मत्तावान बनतात आणि बाकीची माणसे शरणगताच्या भूमिकेत दडपली जातात असे चित्र दिसते. आधुनिक 'शास्त्रशुद्ध' पद्धतीने डेअरीचा,

कोंबडी पालनाचा व्यवसाय करणारा आपण ठरविलेल्या रचनेत / व्यवस्थेत गाई-म्हशींची, कोंबड्याची उत्तम देखभाल करतो, त्यांचे उत्पादन वाढवतो, उपयोग व उत्पादनवाढीची गमके वापरून नेत्रदीपक प्रगती साधतो, तसे काहीसे चित्र आपणास दिसते. त्या ओघात गुरे, कोंबड्या या जशी वस्तू वा यंत्रे बनतात, अशा समाजात सर्वसाधारण नागरिकांची स्थिती होताना दिसते.

बिगर-साम्यवादी देशांमध्येही जेवढी अर्थ व राज्यव्यवस्था केंद्रीभूत, नियोजनबद्ध, कार्यक्षम, 'प्रगत' आणि सत्ताकांक्षी तेवढी तेथील नागरिकांची परिस्थिती अशी असे चित्र दिसते. बहुराष्ट्रीय कंपन्यांच्या वाढीतूनही याच दिशेने वाटचाल होताना दिसते.

विकेंद्रीकरण म्हणजे औद्योगिक क्रांतिपूर्व काळाचे पुनरुज्जीवन नाही. आज मानवजात ज्या टप्प्यावर आहे त्या टप्प्यावर विकेंद्रीकरणाची गोष्ट एका नव्या दिशेने टाकलेले पाऊल असेल. संस्कृती ही मानवनिर्मित असूनही आजपर्यंत माणसाचे वागणे मात्र ती ईश्वरनिर्मित असल्यासारखे, शरणागताचे राहिले. जाणीवपूर्वक निवडलेल्या ध्येयाला अनुरूप अशा संबंधांची जडणघडण सर्व क्षेत्रांमध्ये करण्याइतकी जागृती आणि विवेक आणि आत्मविश्वास विकेंद्रीकरणाच्या दिशेने पाऊल टाकण्यासाठी जरूरी आहे.

नुसता रोजगार किंवा केवळ एक ना एक पातळीवरचे जीवनमान उपलब्ध करून देण्याची गोष्ट असेल तरी भारतासारख्या देशात अनेक मूलगामी बदल करावे लागतील, आणि त्यातूनही व्यवस्था परिवर्तन घडून येईल, असे मूळ लेखातले काहीसे मर्यादित प्रतिपादन होते असे आता माझ्या लक्षात येते. ते एका बाबतीत सुधारून घ्यावयास हवे.

माणसाचा मूलभूत हक्क हा केवळ रोजगाराचा वा पोटाची खळगी भरण्याचा नाही. हक्क एवढाच सीमित केला तर विषम समाजव्यवस्थेतही तो त्याच्या पदरात टाकला जाऊ शकतो, हे माझे म्हणणे आहे. माणसाचा हक्क अधिक व्यापक आशयाचा आहे. पोट भरण्याच्या प्रश्नांची सांगड आणखी दोन गोष्टींशी आपल्याला घालावयाची आहे. त्याचे पोट भरण्यासाठी त्याला जे काम कराव लागते त्यातून त्याचे व्यक्तित्व आकारावे आणि त्याचे इतरांशी संबंध प्रस्थापित व्हावेत. माणसाचे व्यक्तित्व कसे असाव आणि त्याचे इतरांशी संबंध कसे असावेत याविषयी आपली काही दृष्टी आहे. स्वतःच्या भवितव्याचा तो जबाबदार व कर्ता पुरुष असावा, स्वतःच्या इतिहासाचा निर्माता असावा अशी आपली दृष्टी आहे. यासाठी तो समान व स्वतंत्र असायला हवा, पण समान व स्वतंत्र म्हणजे व्यक्तिवादी वा स्वार्थी असा अर्थ नाही. व्यक्ती आणि समाज यांच्यातील आवश्यक व योग्य संबंध स्वीकारून, व त्यातून येणारी कर्तव्ये पार पाडीत असताना तो समान व स्वतंत्र असावा. यासाठी 'वसुधैव कुटुंबकम्' वरही आपण भर देतो.

त्याला मिळणारा रोजगार असा हवा ज्यातून केवळ त्याचे पोट भरेल असे नाही तर ज्यातून त्याचे इतरांशी समानतेचे, भ्रातृभावनेचे, स्वतंत्रतेचे संबंध प्रस्थापित होतील आणि त्याच्या व्यक्तित्वाची सर्जनशील अभिव्यक्ती होईल.

ही दोन उद्दिष्टे पोटापाण्यासाठी कराव्या लागणाऱ्या आवश्यक नित्यकर्माद्वारे साध्य व्हावयाची असतील तर राज्य व्यवस्था, अर्थ व्यवस्था, धर्मकारण, समाजरीती या सर्व क्षेत्रांमध्ये नव्या अनुरूप रचना अस्तित्वात यायला हव्या. मानवी संस्थांचा पसारा किंवा आकारमान मानवाच्या आवाक्यात राहिले पाहिजे. विशेषज्ञांच्या आणि केंद्रीय नोकरशाहीच्या नियंत्रणाची गरज ज्यात उपस्थित राहील अशा रचना ही उद्दिष्टे साध्य करण्याच्या दृष्टीने मारक आहेत. सत्ताकांक्षी आणि वैभवाकांक्षी मंडळींनी नेहमीच अशा रचना आजवर जोपासल्या आहेत. विशेषज्ञांच्या आणि केंद्रीय नोकरशाहीच्या नियंत्रणाची गरज पडायची नसेल तर सर्वसामान्य नागरिकाचा वकूब पुष्कळ वाढवावा लागेल. त्याचे ज्ञान, त्याची समज, त्याचे कर्तृत्व जोपासावे लागेल. दुसरीकडे वेगवेगळ्या सत्ताकांक्षी - वैभवाकांक्षी लोकांशी संघर्ष करावा लागेल. या संघर्षात स्वतःला सुरक्षिततेचा आभास देणाऱ्या राष्ट्र, पुढारी, दैवतं सैन्य यासारख्या अनेक रचनांना मूठमाती पण द्यावी लागेल.

पाध्ये यांनी आपल्या लेखात मित्रशक्ती ओळखण्याचं आवाहन केले आहे. परिवर्तन घडवून आणू पाहणाऱ्यास आपल्याला अनुकूल वा सहाय्य करणाऱ्या शक्ती कोणत्या, विरोधी कोणत्या ते ओळखावे लागेलच. पण मित्रशक्ती ओळखण्याच्या कसोट्या ते सांगत नाहीत. किंवा आजच्या भारतातील विविध शक्तींचे विश्लेषण करीत नाहीत.

खाजगी मालमत्ता हक्काचा शेवट करण्याच्या पक्षातले जे असतील ते मित्र मानावेत अशी एक ढोबळ कसोटी पाध्ये सुचवतात. 'खाजगी मालमत्तेचा हक्क' याचीही अधिक स्पष्टता व्हायला हवी हे पाध्ये लक्षात घेत नाहीत. स्वयंरोजगाराच्या मर्यादेतही उत्पादनाची साधने खाजगी मालकीची नसावीत का? अशा खाजगी मालकीवर कोणती बंधने असावीत? उत्पादनाची साधने सामाजिक

मालकीची असावीत, असे म्हणणारेही मित्र कधी मानावेत? राज्यसत्तेचे निरंकुश स्वामित्व म्हणजे 'सामाजिक मालकी का? सामाजिक मालकीचे वगवेगळ्या क्षेत्रांतील अनुरूप आकृतीबंध स्पष्ट करायला लागतील. आणि अशा सामाजिक मालकीच्याही मर्यादा व तीवरील बंधने स्पष्ट करावी लागतील. समाजात अस्तित्वात असलेल्या खाजगी व सामाजिक दोन्ही प्रकारच्या मालकी हक्कासंबंधीची रचना व्यक्तीच्या मानवीय रोजगाराच्या व जीवनमानाच्या आड येऊ शकते आणि ती आड न येण्यासाठी कोणत्या रचना, रूढी, संकेत, अधिकार, इत्यादिची गरज आहे ते स्पष्ट करावे लागेल.

कष्टकरी जनतेच्या वतीने खाजगी मालमत्ता नष्ट करून 'कामगार वर्गाची हुकूमशाही सत्ता' प्रस्थापित करणाऱ्या पक्ष वा गट वा संघटना या मित्रशक्ती आहेत असे मला आढळत नाही. 'कष्टकरी जनतेने, बहुसंख्य लोकांनी... आर्थिक विकास प्रक्रियेचे नियंत्रण करणे म्हणजे हुकूमशाही प्रस्थापित करणे नव्हे' असे पाध्ये म्हणतात. वास्तवात बहुसंख्य लोक, कष्टकरी जनता प्रक्रियेचे नियंत्रण करणार असतील तर त्यासाठी अर्थव्यवस्था व राज्यव्यवस्था यांची संरचना कोणती असली पाहिजे? पाध्ये यांना अभिप्रेत असलेल्या आर्थिक व राजकीय व्यवस्थेत व्यवहारात सत्ताधारी पक्ष आणि प्रशासन यंत्रणा यांचे नियंत्रण असते. आणि काही एका प्रक्रियेने जनतेची 'संमती' मिळवलेली असली तरी यांचे अस्तित्व स्वायत्त व स्वयंभू असते ही परिचित गोष्ट आहे. देशात एकच एक राजकीय पक्ष इतर राजकीय पक्षांचे, संघटनांचे अस्तित्व वा मरण नियंत्रित करतो आणि तिथे प्रशासनयंत्रणा ही त्या पक्षापासून वेगळी काढता येत नाही तेथे हुकूमशाही अटळपण प्रस्थापित होते. भांडवलशाही अर्थ व राज्य व्यवस्थेतली लोकशाही ही भ्रामक असते असे म्हटले जाते. आभास उत्पन्न व्हावा अशा तरी काही गोष्टी अस्तित्वात असतात. पण या दुसऱ्या व्यवस्थत सरळसरळ पक्षीय हुकूमशाहीच असते. एखाद्या पक्षीय हुकूमशाहीचे वर्णन 'लोकहितदक्ष' असे काही ढोबळ गमकांच्या आधारे करता येऊ शकेल व ते वास्तवही असेल. पण जनतला सामुदायिकरित्या सत्ता राबविता आली पाहिजे ही जर लोकहितदक्षतेची महत्वाची कसोटी असेल तर पक्षीय हुकूमशाही राजवट कधीच लोकहितदक्ष बनू शकत नाही.

'जनतेने सामुदायिकरीत्या सत्ता राबविणे' आणि 'जनतेच्या नावाने/वतीने पक्षाने सत्ता राबविणे' या दोन मूलतः विरोधी संकल्पना आहेत हे पाध्ये स्वीकारतात का? या मूलतः विरोधी आहेत व त्यांना अनुरूप आर्थिक, राजकीय संरचनाही मूलतः विरोधी व भिन्न असतील. भारतात आज ज्या सगळ्या प्रस्थापित राजकीय पक्ष संघटना आहेत, संघटित राजकीय शक्ती आहेत त्या दुसऱ्या संकल्पनेच्या पुरस्कर्त्या आहेत. दुर्भाग्याची गोष्ट अशी आहे की, पक्षांबाहेर कार्य करणारे बहुसंख्य मार्क्सवादी वा वर्गसंघर्षवादी (उदा. संघर्ष वाहिनी, जे.पी. ना मानणारे सर्वोदयी, वगैरे) गटही मित्रशक्ती/शत्रुशक्तींच्या परिभाषेत बोलू लागतात तेव्हा दुसऱ्या संकल्पनेवरच आपल्या युक्तिवादांची, कार्यक्रमांची ('अॅक्शन') उभारणी करतात.

आजची केंद्रीभूत राज्यसत्ता ही 'जनतेने सामुदायिकरीत्या सत्ता राबविण्या'च्या मुळावर येणारी गोष्ट आहे. केंद्रीभूत अर्थव्यवस्था ही या प्रकारच्या राज्यसत्तेचा आधार आहे. या यंत्रणा नष्ट करणे आणि त्या काबीज करणे या दोन मूलतः भिन्न प्रक्रिया/घटना आहेत. नष्ट करण्यासाठी आधी काबीज करण्याची रणनीती आपणास कोणत्या दिशेने नेते

ही गोष्ट सर्व साम्यवादी देशांच्या उदाहरणांवरून जाहीर आहे.

या यंत्रणा नष्ट करण्याची व 'जनतेने सामुदायिकरीत्या सत्ता राबविण्या'च्या उद्दिष्टाशी सुसंवादी रचना निर्माण करण्याची प्रक्रिया एकच आहे. ती विकेंद्रीकरणाची आहे. वस्तूंचे उत्पादन, त्यांचा व्यापार, त्यांच्या उत्पादनाची तंत्रे व पद्धती, दळणवळणाच्या रीती व त्यांचे मान, अर्थव्यवस्थेच्या व राज्यव्यवस्थेच्याही) प्रत्येक घटकबाबींच्या संदर्भात वेगळी तत्वे आधारभूत म्हणून स्वीकारावी लागतील.

मध्ययुगाच्या अखेरीस युरोपात आधुनिकतेचे जे प्रवर्तन सुरू झाले त्या प्रवर्तनातलेच उदारमतवाद व त्यावर आधारित भांडवलशाही व संसदीय लोकशाही आणि मार्क्सवाद व त्यावर आधारित राज्यस्वामित्त्वाधिष्टित नियंत्रित अर्थव्यवस्था व एकपक्षीय हुकूमशाही हे दोन टप्पे आहेत. मानवी समाजाचे जे स्वप्न मार्क्सनें रंगविले ते साकार करण्यासाठी आधुनिकतेच्या अतीव अशा एका नव्या युगाच्या प्रवर्तनाची गरज आहे.